


[ भाग ४ था ]

यशवंत गोपाळ जोशी

प्रथमावृत्ति

२० जुलै १९३८ १। रुपया

# श्री. यशवंत गोपाळ जोशी यांचीं इतर पुस्तकें



| | |
|---|---|
| पुनर्भेट भाग १ ला ( द्वितीयावृत्ति ) | १–४–० |
| पुनर्भेट भाग २ रा | १–०–० |
| पुनर्भेट भाग ३ रा | १–४–० |
| तुळशीपत्र ( कथासंग्रह ) | १–८–० |

**नाटकें**

| | |
|---|---|
| संगीत भोळाशंकर | १–०–० |
| संगीत श्रीमुखांत | ०-१२-० |
| बोलका सिनेमा | ०–८–० |

**कादंबरी**

| | |
|---|---|
| हिरकणी ( शिल्लक नाहीं | |
| होमकुंड ( पूर्वार्ध ) | २–०–० |
| श्रीकांत | १–०–० |
| त्रिदोष | १–०–० |

**संकल्पित**

बळी ! ( कादंबरी )

[ सिनेमासृष्टीतील एक कल्पनारम्य पण भेसूर चित्र ]

प्रकाशक
**पुरुषोत्तम रामचंद्र भिडे,**
बुकसेलर्स ॲन्ड पब्लिशर्स,
टिळक रोड, पुणें २.

मुद्रक
**श्रीपाद रघुनाथ राजगुरु,**
राजगुरु प्रेस,
४०५ नारायण पेठ, पुणें २.

# कथाक्रम


| | | | पृष्ठ |
|---|---|---|---|
| आई ! | ... | ... | १ |
| दोन हृदये | ... | ... | ७ |
| आठवणींचें वल्हें ! | ... | ... | १३ |
| फितूर | ... | ... | २९ |
| आयुष्यांतील अपवात | ... | ... | ३६ |
| जुन्या वस्तु | ... | ... | ४४ |
| एक क्रांतिकारक | ... | ... | ५३ |
| ममईंची सुंद्री | ... | ... | ६१ |
| सत्ययुगाला सुरुवात ! | ... | ... | ६६ |
| नामदार खेर मुख्य प्रधान कसे झाले ? | | ... | ७४ |
| जागा भाड्यानें देणें आहे ! | ... | ... | ८३ |
| खोटी गोष्ट ! | ... | ... | ९१ |
| तोच आवाज ! | ... | ... | ९८ |
| राहिलेले शब्द ! | ... | ... | १०४ |
| आम्ही येथे येऊन गेलों ! | ... | ... | ११३ |
| उद्यां मेलों तर ? | ... | ... | १२० |

# आई . . . . . : . . : १

"अरे भाऊ, आज द्वादशी आहे. आज तरी आंघोळ करून बाहेर जा— आणि हो, आज अगदी साडेदहाला परत ये हो. कालची एकादशी आहे मला—आलास साडेदहाला तर मला बाराच्या आंत जेवायला मिळेल." आईने मला अगदी विनवणीने सांगितले.

—पण बाळाने ऐकायला पाहिजे ना!

"छे! उकाडा कोण होतो आहे हल्लीं— आंघोळ करून बाहेर पडलों—तरी बाहेरून फिरून आलो, कीं घामानें आंघोळ होते पुन्हा! तेव्हां आल्यावरच आंघोळ करीन. येतो मात्र अगदीं साडेदहाला हं!"

"तुझं नेहमीचंच आहे तें—" आईनें म्हटलें.

डोक्यावरची टोपी झाडून पुन्हा डोक्याला घालीत मीं म्हटलें, "बरं आई, तें कांहीं नाहीं— आजचं जाऊं दे; पण काय वाटेल तें झालं तरी उद्यांपासून आंघोळ करूनच घराबाहेर पडत जाईन!"

या माझ्या म्हणण्यावर आई फक्त मिस्किलपणानें हसत म्हणाली, "उद्यां-पासून–? ही उद्यां केव्हां उजाडणार आहे देवाला माहीत! काय रे, एक दिवससुद्धां माझं ऐकत नाहींस? आईला सुखांत ठेवली तर ती लवकर मरेल— म्हणून का क्षुल्लक बाबतींत मला तूं छळतोस असा?"

आईच्या या बोलण्यावर माझें उत्तर—

"खरंच साडेदहाला येतों हं—" लगेच मी घाईघाईनें बाहेर आलों. सुटलों आईच्या तडाक्यांतून असें वाटून– सायकलची घंटा आनंदाच्या भरानें वाजविली आणि सायकलस्वार होऊन मी बाहेर पडलों!

उद्यां...

उद्यां...

उद्यां...!

आज कमींत कमी पंधरा वर्षें झालीं असतील, मी आईला नित्यनेमानें रोज कबूल करतों आहे, कीं 'उद्यांपासून मी आंघोळ करून सकाळीं बाहेर पडेन म्हणून.' पण आज पंधरा वर्षांत ती उद्यां उजाडलेली नाहीं!

आईहि रोज मला तेंच सांगते– आणि मीहि उद्यांचें पालुपद रोज म्हणतों.

आणि लवकर येतों म्हणूनहि रोज सांगावयाचें आणि यायचें मात्र नेमकें साडेअकरा-पावणेबाराचे सुमारास– घामानें निथळत!

आईचा स्वैंपाक झालेला असायचा– माणसें जेवण्याकरितां खोळंबलेलीं असायचीं– आणि आई देवासमोर बसून शिवलीलामृताचा अकरावा अध्याय म्हणत असायची!

किती वर्षें हें असें चाललें आहे म्हणतां?

किती वर्षें हें सांगतांच येत नाहीं—दुपारचे साडअकरा-पावणेबारा म्हटलें, कीं वरील प्रसंगाखेरीज माझें दुसरें कांहीं वेळापत्रकच नसतें!

मला वाटतें 'असें करायचें' आम्हीं कोणी ठरविलें नव्हतें म्हणूनच ते नित्यनियमानें होत होतें!

आणखी एक– आईची इच्छा असायची, कीं ती अध्याय म्हणत असतांना आम्हीं कोणी तिच्याशीं बोलूं नये म्हणून! पोरेंबाळें त्या वेळेला मुकाट बसत! पण मी घरांतला कर्तासवरता पुरुष—!

मी वाटेल तसें वागायचें नाहीं मग कुणी वागायचें?

मीं मुद्दाम आईशीं त्या वेळेला बोलण्याचा प्रयत्न करायचा. कारण बाहेरच्या भानगडी आईजवळ बोलायला मला नेमकी तीच वेळ असायची!

पहिल्यांदा आईनें नुसतें 'हुं' करायचें, मग एक-दोनदां खोकायचें आणि मग एकदां रागानें वळून माझ्याकडे पाहावयाचें– हें सर्व रोज व्हायचें– पण आईनें रागानें पाहिलें मात्र, कीं बायकोनें बादलींत आंघोळीकरितां उपसलेलें पाणी पटकन् उचलून टॉवेल खांद्यावर टाकून आंघोळीला पसार व्हायचें.

वरच्या कार्यक्रमांत आजच फरक व्हायला आज कांहीं कपिलाषष्ठीचा योग नव्हता ! मी यायचा त्या वेळींच नेमका बाराला परत आलों. आईनें अध्याय म्हणायला नुकतीच सुरुवात केली होती.

मी कपडे काढून घरांत येतांच आईनें एकवार माझ्याकडे पाहिलें आणि एकवार समोर टांगलेल्या घड्याळाकडे पाहिलें.

धोतराचा सोगा खांद्यावर टाकीत मी हसलों आणि म्हणालों, " आईय् ! "

आज मला बाहेर एक आनंदाची बातमी कळली होती आणि ती आईला सांगायला मी अधीर झालों होतों.

" आईय्— "

आईनें माझ्याकडे पाहिलें आणि पुन्हा मान वळवून देवाकडे पाहत तिनें अध्याय म्हणायला सुरुवात केली.

मी पुन्हा म्हणालों, " आईय् एक मिनिट—"

देवासमोरचें देवमाणूस नुसतेंच 'हुं' म्हणालें.

" आई, तें कांहीं नाहीं. आज तूं बोललंच पाहिजेस ! मला तुला एक गोष्ट सांगायची आहे ! " आई माझ्याकडे पाहून हसली !

चुलीशेजारीं उभी असलेली बायको स्वगत म्हणाली, " जेवायला कोण उशीर झालाय् ! "

" आई, आज तें कांहीं चालायचं नाहीं– मी सांगतों तें ऐक आणि मग म्हण अध्याय पुढें— "

आईनें हसत हसत देवाला नमस्कार करून अध्याय अर्धवटच पुरा केला आणि तोंड माझ्याकडे फिरवून म्हणाली, " हं, सांग काय सांगायचं तें. "

मला काय सांगायचें होतें तें मीं आईला सांगितलें. कुठें एक पांच-पंचवीस रुपये मला जास्त मिळणार होते– हें जेवतांना सांगितलें असतें तरी चाललें असतें ! पण इतकें बजावूनहि पुन्हा रोजच्यापेक्षां दहा मिनिटें उशिरानेंच

आल्याबद्दल आई कितपत रागावली आहे याचा अंदाज काढण्याकरितांच माझी ती घाई होती !

मी आंघोळीला गेलों; पण आज मला फारच गंमत वाटत होती. कारण काय? किती तरी वर्षांनीं आज आई अध्याय सोडून बोलली !

देवधर्मावर माझा विश्वास नव्हता असें मुळींच नाहीं— पण आईला 'बोलायला लावलें' यांत मला खूपच आनंद झाला होता !

हसत–मजेंत जेवण झालें. आज जेवतांना मी पाणीहि खूप प्यालों. मजेंत ढेकरा दिल्या आणि अडकित्त्यानें सुपारी फोडीत मी माझ्या बसावयाच्या खोलींत येऊन बसलों.

मला त्या वेळेला कसला इतका आनंद झाला होता तें मला नीटसें सांगतां येत नाहीं; पण त्या आनंदाच्या उन्मादांत मी टेबलावरच्या आरशांत पांचदहा मिनिटें स्वतःचाच चेहरा पाहत बसलों.

कांही कांहीं सवयीचें पृथक्करणच करतां येत नाहीं. अशा कांहीं अनपेक्षित गोष्टी झाल्या, कीं पांचदहा मिनिटें तरी स्वतःचाच चेहरा आरशांत पाहण्याची मला सवय आहे.

पुन्हा पाणी प्यावेंसें वाटलें म्हणून स्वैपाकघरांत गेलों आणि माझ्या आनंदावर विरजण पडलें !

दीड वाजून गेला होता !

आईला कालची एकादशी होती !

मला वाटलें होतें आई जेवावयाला बसली असेल आणि मी घरांत जातांच आईकडून उशिरा येण्याबद्दल मला कांहीं तरी टोमणा मिळणार.

पण—

घरांत जातांच मला काय दिसलें ?

तूपमीठ वाढलेलें आईचें पान—पाटाखालीं अर्धवट सारलेलें होतें. आणि राहिलेला अर्धा अध्याय जेवणाआधीं पुरा करण्याकरितां आई देवाला नमस्कार करून पुन्हा पहिल्यापासून म्हणायला सुरुवात करीत होती.

तें पाहून मीं उभ्या–उभ्याच डोळे मिटले ! माझी तहान भागली. मी आल्याची चाहूल आईला लागूं नये म्हणून हलक्या पावलीं मी परत खोलीकडे वळलों.

" आई-आई–" मी मनांत पुटपुटलों– मनांत विचारांचा गोंधळ चालला होता. तशांतच मीं अंथरूण उघडून त्यावर अंग टाकलें आणि अंगावर पांघरण्याकरितां उपरणे घेत घेत मी मोठ्यानेंच म्हणालों—

" **पुत्राचे सहस्र अपराध– माता काय मानी तयाचा खेद !** "

—आणि कुशीवर वळून मी झोंपीं गेलो.

* * *

वरचा प्रसंग दोन-अडीच वर्षांपूर्वीचा आहे. अजून मी आंघोळ न करतांच सकाळीं बाहेर पडतो– साडेअकरा– बारालाच परत येतो. आई त्या वेळीं अध्याय म्हणत बसलेलीच असते. पण आतां मात्र त्या वेळेला मी बोलतांना अडखळतों– पण सवय कुठे जाते आहे. एखादा अर्धवट प्रश्न विचारून नंतर जीभ चावीत आंघोळीला जातो—

चाललें आहे– हें असेंच चाललें आहे व असें आणखी किती तरी दिवस चालायचें आहे ! माझ्या आईला त्रास द्यायची माझी बिलकूल इच्छा नाहीं. पण– कांहीं क्षुल्लक बाबतींतच माझ्या हातून ते पार पडत नाहीं !

हें असें कां होतें ? आणि या छोट्या त्रासदायक प्रसंगां व प्रसंगांच्या आठवणींनीं आम्हा दोघांनाहि आनंद कां होतो ? 'मुलगा ऐकत नाहीं' ही तक्रार सांगण्यांतहि आईला एक प्रकारचा अभिमान वाटतो आणि 'मी आईचें ऐकत नाहीं' हें सांगण्यांत मलाहि खूप मौज वाटते !

निर्व्याज आणि निर्विकल्प प्रेमाच्या झाडावर अशाच मधुर प्रसंगाचे रायआवळे लागतात! या रायआवळ्यांचा जेव्हां बहर असेल तेव्हां ते रायआवळे खावे. जेव्हां बहर नसेल तेव्हां त्या तसल्या रायआवळ्यांची नुसती कल्पना केली आणि त्यावर तसल्याच आठवणींचें पाणी प्यालें कीं, मुली म्हणतात ना–

" **आवळा खावा, पाणी प्यावें, आणि माहेरीं यावें–** " त्याप्रमाणें संसारांत दुःखद अशा समर-प्रसंगांतहि आनंदलहरींचा झरा लागतो !

मी मानसशास्त्रज्ञ नाहीं—कोणत्याहि गोष्टीचें तार्किक पृथक्करण मला करतांच येत नाहीं ! वर लिहिलेल्या प्रसंगांत विशेष काय आहे असें जर मला कोणी विचारलें तर मला कांहींच सांगतां येणार नाहीं !

पण मी अभिमानानें एक मात्र सांगूं शकेन कीं, वरची आठवण आणि प्रसंग हीं एक माझ्या प्रत्येक दिवसाच्या विसांव्याची घटका आहे !

माझ्या मनाला उत्साहानें भारणारी ती एक प्रेमाची फुंकर आहे ! !

## दोन दृश्यें : : २

यशोदाबाईंना आपल्या मुलीची अलीकडे फारच काळजी वाटूं लागली होती. तिच्या प्रत्येक हालचालीवर त्यांचें बारीक लक्ष असे. कुठें बाहेर जातांना त्यांच्या मुलीनें—द्वारकीनें— जरी कुठें फणी घेऊन केसांची आवरासावर केली, कीं त्या तिला रागें भरत; मग तीहि मिस्किलपणानें हसत, "छे ग, मी नुसता आरसा पाहत होतें" अशी बतावणी करून घाईघाईनें आरसा पाहून भर्रर्र-दिशीं निघून जाई!

द्वारकीला आतां सोळावें सरून सतरावें वर्ष लागलें होतें. द्वारकी तशी उफाड्याची होती. केशसंभारहि मृदु पण भरदार. वर्णानें गोरी, सतेज.—एक नंबरची बोलकी. तिची घरांतील 'ये-जा' ही अशी झपाट्याची असें कीं जणूं सोसाट्याचा वारा!

यशोदाबाईचें तें शेंडेफळ असल्यामुळें द्वारकी लाडांतच वाढली होती. तिचें बोलणेंचालणें कमालीचें मोकळें. वर्ष दीडवर्षापासून याच द्वारकीचे यशोदाबाई कोण कोडकौतुक करायच्या; पण अलीकडे मात्र त्या आपल्या मुलीकडेच चमत्कारिक पाहत! तिच्या कोणत्याहि वागण्यांत त्यांना दोषच दिसत—! 'इथेंच कां बसलीस?' 'आतां दरवाजांतच कां उभी राहिलीस—?' 'न्हायल्यानंतर फणी घेऊन केसच कशाला विंचरायला पाहिजे होते?' वगैरे प्रत्येक ठिकाणीं त्या तिला वांकडें लावीत.

द्वारकीला कळेना आई आपल्याशीं हल्लीं असें कां वागते आहे तें?

आणि अशा या जगाचा अनुभव नसलेल्या— आणि म्हणूनच स्वैरपणानें वागणाऱ्या फुलाला कोण जपणार नाहीं? त्या फुलाला जपतात ते फुलाच्या

अंगीं कांहीं दोष असतात म्हणून नव्हे तर— आणखी कांहीं कारणें असती-लच आणि असतातहि ! पण मुख्य कारण म्हणजे " माया खरी आंधळी ! "

" अलीकडे द्वारकी अमर्याद होत चालली आहे ! " असें यशोदाबाईंच्या मातृहृदयाचें गाऱ्हाणें होतें !

आणि तें कां माहीत आहे का ?

तिचें अद्याप लग्न व्हावयाचें होतें म्हणून !

त्यांना ती आतां घरांत अडगळीसारखी वाटूं लागली होती ! तें कन्याधन एकदां ज्याचें त्याला देऊन टाकायला त्या अधीर झाल्या होत्या !

कधीं मनांत, कधीं उघड, कधी शेजाऱ्यापाजाऱ्यांजवळ त्यांचा एकच जप, " अहो, अशी ही उफाड्याची पोर—आतां आपली मार्गाला नको का लागायला ! अन् मला बाई काळजी वाटते—हिचं सासरी होणार तरी कसं ? धड कोणचंच काम चित्त लावून करीत नाहीं ! बरं, वागण्याचा हा असा धडमधाडगा ! कांहीं नाजुकपणा आहे का त्यांत ? अहो, हल्लीं काम करतांना सांडलवंड तरी तिच्या हातून किती होते म्हणतां ? धड एक तासमुद्धां माझं बोलून घेतल्याशिवाय जात नाहीं तिचा ! मला बाई या पोरीची किनई फारच काळजी वाटते हो ! " आणि यानंतर एक लांब सुस्कारा !

पण मनांत इच्छा मात्र ही वावरायची, कीं ऐकणाऱ्यानें म्हणावें, "अहो, मुली अशाच करावयाच्या हो ! त्या मानानें तुमची द्वारकी किती तरी हुशार, चलाख आणि सुंदर आहे ! सासरीं माहेरचं नांव गाजवील पाहा !"

पण त्यांची ही इच्छा नेहमींच सफल होत नसे !

एक दिवस—वेळ संध्याकाळची होती—द्वारकी दरवाजांत उभी होती—सुमारें अर्धा एक तास. यशोदाबाई आज सकाळपासूनच तिच्यावर रागावलेल्या होत्या. कारण काय ? तर नक्की जमणार अशीं वाटलेलीं एक दोन 'स्थळें' आजच फिसकटलीं होतीं !

यशोदाबाईंना मुलींनीं रस्त्यांत उभें राहण्याची फार चीड होती. द्वारकीहि कधीं फारशी उभी राहत नसे. पण आज योगायोग—

द्वारकीला आज आपल्या आईच्या हातचा शेवटचा मार खावयाचा होता !

हं—भलतेंच मनांत आणूं नका– ती लवकरच लग्न होऊन सासरीं जाणार होती !

यशोदाबाई सहज अंगणांत आल्या तों द्वारकी दरवाजांत उभी. त्या तावाने द्वारकीजवळ आल्या व तिचा हात धरून म्हणाल्या, “ हजारदां सांगितलं असेल कार्टीला, रस्त्यांत उभी राहत जाऊं नकोस म्हणून ! पण ऐकेल तर शपथ ! काय असतं ग तुझं रस्त्यांत ? बया दिसतेच आहे नशिबाची ! आज दोन वर्षे झालीं कार्टीचं कुठं म्हणून जमत नाहीं ! या कार्टीच्या नशिबांत लग्न तरी आहे का नाहीं कुणास ठाऊक ! का बया जाणार आहे एखाद्याचा हात धरून––”

द्वारकी मुळूमुळू रडूं लागली. ती घरांत जायला लागली पण यशोदाबाईंनी तिचा हात सोडला नाहीं. दोघी मायलेकी तशाच घरांत आल्या. द्वारकी रडत होती. यशोदाबाई बोलत होत्या !

द्वारकीचें रडणें थांबेना.

“ हं ! हा आणखी कांगावखोरपणा शिरला आहे कार्टीच्या अंगांत अलीकडे. मी मारण्याच्या अगोदरच हिची रडायला सुरुवात—” असें म्हणून यशोदाबाईंनी द्वारकीच्या गालावर चार-पांच चापट्या मारल्या !

मारल्याशिवाय रडायचे म्हणजे काय ? एवीतेवी द्वारकी रडतच होती म्हणूनच यशोदाबाईंनीं मारले असावे बहुतकरून ! रडायला कारण नको कां ? पण––कणखर शब्दांनींसुद्धां रडायला येतें. हें यशोदाबाई विसरल्या होत्या !

द्वारकी मुळूमुळू रडूं लागली. यशोदाबाई तोंडांतल्या तोंडांत कांहीं तरी पुटपुटत होत्या. वेळ संध्याकाळची होती.

“ हं बयाबाई, आटपा रडणं आतां– कांहीं मुलखावेगळं मारलं नाहीं मी तुला ! हं, आणखी घरांत रडूं नका आतां तिनीसांजच्या ! घरीं यायची ही वेळ झाली आहे— ”

—तोंच घरी आले.

आणि अंगावरचें उपरणें खुंटीवर ठेवीत द्वारकीकडे पाहत म्हणाले, “ का ग, काय झालं ? अं ? वाटलं पोरगी आणखी किती त्रास देत आहे कुणास ठाऊक––पण त्या गोष्टींचं स्थळ नक्की करून आलों. आणि येतांना भटजींना मुहूर्तहि पण पाह्यला सांगितला आहे ! ”

" खरंच का ? " वातावरण बदललें ! " हं चला आंत आतां--आणि गाऱ्हाणं नको कांहीं सांगायला- माझा काय मुलीवर हक्कच नाहीं वाटतं-मग दिली एक रागाच्या भरांत चापटी-आतां सांपडणार आहे का कधीं मारायला ? "

आई, मोठंच नुकसान आहे म्हणायचं तुझं ? आपली अजूनहि आईच्या हातची तोंडांत खायची तयारी आहे ! पण तुलाच आतां आम्ही मोठें झालों असं वाटतं त्याला आम्ही काय करणार ?

लवकरच त्या हूड, अल्लड, अमर्याद, पोरीचें- द्वारकीचें- लग्न झालें. यशोदाबाईची काळजी मिटली. आणि अडगळीप्रमाणें वाटणाऱ्या त्या द्वाड द्वारकीला- सासरचीं माणसं-लवकर लवकर माहेरीं पाठवीत नाहींत म्हणूनच अलीकडे यशोदाबाईची तक्रार असे !

* * *

फुलांच्या हाराचा वास घ्यावा त्याप्रमाणें एकेक दिवसाच्या फुलानें गुंफलेला दोन वर्षांचा हार त्या कुटुंबाच्या आयुष्यांतून नाहींसा झाला होता ! आणि हाराच्या वासाची आठवण राहावी त्याप्रमाणें त्या दीड वर्षांचा स्मृतिगंध आजूबाजूला दरवळत होता !

—एक स्मृतिचिन्ह निर्माण झालें होतें.

—तें आज सहा महिन्यांचें होतें.

—त्याचें नांव ' किशोर !'

'किशोर' द्वारकीचा मुलगा-यशोदाबाईचा नातू !

आज द्वारकी सहज माहेरीं आली होती. तिनें आपला 'किशोर' माजघरांत निजवला होता; आणि लगतच्या ओटीवर ती मैत्रिणींबरोबर पत्ते खेळत होती.

यशोदाबाई भिंतीला पाठ देऊन स्वस्थ उभ्या होत्या !

आतां द्वारकीच्या वागण्यांत कोण फेरबदल झाला होता म्हणता ? आईनें चार-चारदां मारलेल्या हाका पूर्वी द्वारकीला ऐकूं येत नव्हत्या पण आतां किशोरनें माजघरांत थोडीशी जरी अस्पष्ट चाहूल दिली तरी-मोठ्यांदा घंटारव व्हावा त्याप्रमाणें तिला ती ऐकूं जाई !

माजघरांत किशोरनें जागा झाल्यानंतरचा टाकलेला मोकळा श्वास मोठ्यांदा चाललेल्या रामनामाच्या गजराप्रमाणें तिचें चित्त वेधून घेई आणि—

—आणि पूर्वी आईनें हाक मारतांच विलंबाच्या सबबी सांगणारी पूर्वीची द्वाड द्वारकी 'येवढं पान वाचून येतें', 'विणण्याची येवढी ओळ तरी पुरी होऊं दे', 'हें काय ग आई–आलें ना दोन मिनिटांत–'

—पण तीच द्वारकी आतां किशोरच्या बारीक हालचालीनें सुद्धां ऐन रंगांत आलेल्या पत्त्याच्या डावाचीं पानें तशींच टाकून घाईघाईनें जात होती!

—किशोरला थोडे थोपटून पुन्हा खेळांत सामील होई.

—असें दोनचार वेळ झालें.

—भिंतीला टेकून यशोदाबाई उभ्या होत्या. त्या अद्याप आपल्या मुलीचा तो मातृवात्सल्याचा मुग्ध-मधुर नाच रंगलेल्या एकतानतेनें पाहत होत्या.

—ओटीवरचा पत्त्याचा डाव रंगांत आला होता. द्वारकी मोठ्या हमरी-तुमरीनें खेळत होती. आतां बोलतांना तिचा पूर्वीचा अल्लडपणाहि पूर्णपणें जागृत झाला होता. कारण डाव पूर्ण तिच्या बाजूचा होत चालला होता. म्हणून तिच्या अंगांत खेळकर वीरश्री चढली होती.

पण सुखाचा आत्यंतिक क्षण बहुतेक माणसांच्या हातीं लागत नाहीं !

—आंत किशोरनें एकदम रडायला सुरुवात केली.

झालें. हातांतील पत्ते तसेच घाईघाईनें फेकून देत व तोंडानें "पुरे बाई आतां—आतां नाहीं राह्यचा तो" असें म्हणून द्वारकी झटकन् आंत निघून गेली.

किशोरचें रडणें थांबलें; आणि आईच्या हातांच्या हिंदोळ्यावर बसून मधुर हास्याचे फवारे सोडीत तो बाहेर आला.

किती साधा प्रसंग !

पण तो पाहत असतांनाच यशोदाबाईंना काय अनुपम आनंद वाटत होता.

—द्वारकीचें पुढें सासरीं कसें होईल– तिला मूल झालें तर ती त्याची योग्य जोपासना करील का नाहीं, ही काळजी यशोदाबाईंना विनाकारणच लागलेली होती.

पण आतां त्या पूर्णपणें निष्काळजी झाल्या होत्या.

आणि कोणत्या मातृहृदयाला ही काळजी लागत नाहीं ?

—पण त्यांना कळत नाहीं– हवामानाप्रमाणें झाडें बहरतात– त्यांना मोहर येतो. फळें फुलें धरतात—फुलें फुलतात—

—पण असें असलें तरी माळी–शेतकरी कधीं निष्काळजी असतो का?

द्वारकीच्या बालहृदयाचें मातृहृदय झालें. आणि कोणत्याहि गोष्टीला असाच वळसा असतो ! मनुष्य पहिल्यांदा मातेवर प्रेम करायला शिकतो आणि त्या शुद्ध—शुभ्र दुग्ध प्रेमापासून पुढें इतर सलगीच्या प्रेमाची नानारंगी इंद्रधनुष्यें निर्माण होतात !

इतक्यांत द्वारकीनें किशोरचें प्रेमभराने चुंबन घेतलें आणि किशोरला आपल्या आईच्या हातांत बळजबरीनें ठेवीत ती म्हणाली, " बघ बाई ! हसण्यालाहि वेळ नाहीं आणि रडण्यालाहि वेळ नाही ! आई घे ना त्याला ज़रा वेळ ! "

आईनें नातवाला घेतले.

द्वारकी पुन्हा पत्त्याच्या डावाकडे पाहूं लागली.

पण खेळांतल्या बाकीच्या खेळाडूंनाहि कांहीं तरी असे पाश असतीलच ना?

आपआपल्या पाशाच्या अनुरोधानें त्याहि एकएक नाहींशा झाल्या होत्या !

## आठवणीचें वल्हें ! : : ३

" खरंच गडे, आपण असे अधून मधून खिन्न कां होता ? लग्न झाल्या दिवसापासून माझ्या लक्षांत आलं आहे—पण आज-उद्यां करतां करतां आपला छोटा वसंत आज पांच वर्षांचा झाला, तेव्हां मी आपणांस विचारायचा धीर करतें आहे—खरंच महिन्यांतून एखादा दिवस तरी पाहतें, कीं आपण दोघे बोलत असतांना—मधेंच एकदम आपण विषय पालटतां किंवा एकदम बोलणंच मधें थांबवतां आणि उसासे टाकून तोंडानं शीळ घालीत कुठं तरी पाहत बसतां—"

एवढें सगळें स्पष्ट बोलून सुशिलाबाईनीं मध्येंच आपला पदर सावरला. मधेंच त्यांना आपल्या स्त्रीत्वाची जाणीव झाली. त्यांनीं आपले केस नीटनेटके केले आणि गालांतल्या गालांत किंचित हसत—किंचित् बोबडेपणानें त्या पुढें म्हणाल्या, " आपल्या मनाला कसली जखम तर नाहीं ना झालेली ? कांहीं प्रयणभंग—कुणी मुलगी आपल्याला पाहिजे होती—आणि त्याऐवजीं मिळाले मी—आपली कुरूप—काळीसांवळी—अजागळ—"

सुशिलाबाईच म्हणताहेत, " आपली—कुरूप—काळीसांवळी—अजागळ " तेव्हां त्या सांगण्यासारख्या हुशार, सुरूप, सुंदर व गौरवर्ण होत्या हें सांगण्याचें कारणच नाहीं !

हातांतील एका मासिकाचा अंक चाळीत व सुशिलाबाईच्याकडे रोखून पाहत वसंतराव म्हणाले, " तुला खरं सांगूं का ? जग हें या मासिकाच्या मुखपृष्ठावर छापलेल्या तीन रंगी चित्रासारखं आहे ! "

सुशिलाबाई म्हणाल्या, " बरं असेल, मग—"

" एक गोष्ट आठवली, ती सांगतों तुला आधीं. पांच-दहा वर्षांपूर्वीची गोष्ट आहे ती– माझे स्नेही ते कृष्णराव—"

सुशिलाबाई म्हणाल्या, " मी आपल्याबद्दल विचारतें आहे. आपण उसासे कां टाकतां? मधेंच खिन्न कां होतां?—ह्या प्रश्नांत कृष्णरावांचा काय संबंध आला?"

" मांजर नाहीं का कारण नसतांना मधेंच आडवं येत?"

" पण तें हाकून लावतों आपण लगेच—"

" तसंच कृष्णरावांच्या हकीकतीचं मांजर मी झटकन् सांगून हाकून देणार आहे. तो गृहस्थ जरा बायकांच्या बाबतींत जास्त रसिक आहे, हें तूं जाणतेसच. त्याची एक प्रेमाची छोटीशी लघुकथा दुःखान्त आहे तेवढी सांगतों."

" दुःखान्त असली तर ती सांगूं नका—"

" पण ऐकणाराला ती हास्यकारक आहे!"

" थांबा म्हणून थांबणारे कांहीं तुम्ही नव्हत—"

" हें तुला कळल्याला मला वाटतं आतां बरींच वर्षं झालीं असतील!"

कपाळाला आठ्या घालीत सुशिलाबाई म्हणाल्या, " बरं, सांगा एकदां काय तें!" आणि ऐकण्याचा आपला उत्साह दाखविण्याकरितां त्यांनीं एक जांभई दिली!

" तुझी जांभई जितकी लांबेल तितकी माझी गोष्ट लांबेल हं!"

सुशिलाबाईनीं एक आवंढा गिळला आणि म्हटलें, " हं सांगा आतां–"

वसंतराव सांगूं लागले,

"—चारपांच वर्षांपूर्वींची गोष्ट. कुठल्याशा मासिकाच्या मुखपृष्ठावर एका सिनेमा–नटीचा तीन रंगी फोटो छापून आला होता. तिच्या नांवामागें नटींच्या नित्य मालकीचें 'कुमारी' हें विशेषण होतें. ह्या कृष्णरावांनीं तें चित्र पाहिलें, तेव्हां तो 'कुमारच' होता. बेट्यानें ठरवलें, कीं त्या तीन रंगी 'कुमारिकेशीं' संसार करावयाचा! आणि लगेच त्यांनीं तिची ओळख कशी काढायची, भेट कशी घ्यायची, वगैरे सर्व ठरवून एका आठवड्यांत तो मुक्कामाला पोंचला, आणि जेव्हां का मध्यस्थानें " कुमारी–सिनेमा नटी त्या

द्याच." असें कृष्णरावांना सांगितलें तेव्हां त्या कुमारीकडे एकवार अखेरचें निरखून पाहत कृष्णराव जे तिथून पळाले ते घरीं येऊन त्या तीन रंगी चित्राचें मासिक बरोबर घेऊन परत तिथें गेले. आणि त्या तीन रंगी चित्राशीं जेव्हां त्या कुमारीला ताडून पाहायला लागले— तेव्हां जगांत 'कला' काय भयंकर प्रमाणांत माजली आहे आहे आणि खऱ्या जीवनांत तिचा किती ठणठणाट आहे याचा साक्षात्कार झाल्यामुळें त्या कुमारीला 'मातोश्री' म्हणून साष्टांग नमस्कार घालून व "माझा कांहीं तरी भलताच गैरसमज झाला होता" असें तिला सांगून त्यांनीं पुढच्याच आठवड्यांत सांगून आलेल्या एका मुलीशीं 'निंद्य'* विवाह केला !

सुशिलाबाई हसत म्हणाल्या, "मग त्या दृष्टींनीं तुमचा माझा निंद्य विवाह झालेला आहे तर मग ?— आणि म्हणून का आपण असे मधूनमधून खिन्न होतां ?"

वसंतराव कांहींसे गंभीर होत म्हणाले, "असेंहि असेल कदाचित् !"

एवढें म्हटल्यानंतर वसंतरावांना नेहमींचा खिन्नतेचा झटका पुन्हा आला आणि ते आपल्या पहाडी आवाजांत म्हणूं लागले—

**"पाहिन नंतर । वाट वर्षभर । दावुनि चित्त विलोल,**
**—कोकिळे ऐकव तव मधु बोल !"**

* * *

—ज्या पंखांच्या उघडझापीनें पांखरें सकाळीं घरट्यांतून बाहेर पडतात त्याच पंखांच्या उघडझापीनें तीं रात्रीं परत आपल्या मुलाबाळांत येऊन पडतात. त्याप्रमाणें गेलेल्या काळांत भोगलेल्या सुखदुःखाच्या संसारांत माणसाला आठवणीच्या पंखांच्या साह्यानें पुन्हा रममाण होतां येतें. येवढेंच नव्हे, तर पुढील काळ जर माणसाला आशादायक राहिला नसला तर गतकालांतील आठवणीचे जुने पंख फडफडवूनच मनुष्य कालक्रमणा करीत असतो.

---

* मिश्रविवाह, पुनर्विवाह, पळवापळवीचे विवाह हे वर्तमानपत्रांतून 'अभिनंदनीय विवाह' या सदराखालीं गाजत असल्यामुळें पत्रिका-मुलगी पाहून वडिलांच्या संमतीनें ठरणारे व वर्तमानपत्रांत छापून न येणारे ते सर्व 'निंद्य' विवाह होत असें वसंतरावांनीं ठरविलें होतें !

वसंतरावांचेंहि असेंच झालें होतें.

त्या वेळीं ते कॉलेजांत होते.

वसंतराव हे पहिल्यापासून वागणुकीनें अगदीं साधे असत.

एक दिवस ते घाईंत होते, तों टोपी सांपडेना. ते तसेच बाहेर पडले. धोतराचा सोगा त्यांनीं खांद्यावर टाकला आणि आपल्या खोलीला कुलूप लावून सांखळीसकट असलेली किल्ली हातानें फिरवीत ते कोपऱ्यावर जाऊन आले.

त्यांच्या डोक्यावर टोपी नव्हती. त्यांच्या पाठीमागें येणाऱ्या पोरांनीं सहज कुणाला तरी सांगितलें कीं, "तो बोडका चालला आहे ना? तो कॉमरेड बरं का!"

"कॉमरेड" होणें इतकें सोपें आहे हें वसंतरावांच्या त्या दिवशीं लक्षांत आलें. मग ते नेहमींच उघड्या बोडक्यानें फिरायला लागले.

—काल तर शिवाजीमंदिरांत ते बोललेसुद्धां!

—मग काय देशभक्तहि ठरले!

—मग त्यांना आपण 'पुढं' आल्यासारखेंहि वाटायला लागले!

—त्यांच्याच क्लासमधली एक मुलगी त्यांच्या समोरच राहत होती हें आजपर्यंत त्यांच्या लक्षांत आलें नव्हतें.

—वसंतराव सहज केसांतून कंगवा फिरवीत खिडकींत उभे होते. वेळ संध्याकाळची होती!

—दिवस डोळे मिटीत होता आणि रात्र डोळे उघडीत होती!

—आकाशांत रंगी-बेरंगी शिडकाव्यांचा रंगपंचमीचा खेळ चालला होता.

—जाणाऱ्यायेणाऱ्या मोटारींमुळें धूळ उडत होती!

—शहरांतील तरुण व वयस्क विद्वान् सौम्य वितंडवाद खेळत फिरायला जात होते!

—वसंत आपल्या खिडकींत उभा राहून शीळ घालीत होता.

—समोरची मुलगीहि समोरच्या खिडकींत आली. तिनें वसंताकडे पाहिलें व दोन्ही हातांनीं खिडकीचे गज अल्लडपणानें धरून तिनेंहि एक लकेर सोडली.

"ऐक तुझा स्वर आर्त खरोखर वाटे मज बिनमोल
वसंत नाहीं अजुन संपला—ऐकव तव मधु बोल !"

वसंतानें भान न राहून त्याच गाण्यांतील चरण

"ऐकव तव मधु बोल, कोकिळे !
—ऐकव तव मधु बोल !" पुढें म्हटला.

—खरोखरच कोठून तरी कोकिळेचा आवाज ऐकूं आल्यासारखें त्यांना वाटलें.

'कुहू ऽ ऽ कुहू ऽ ऽ कुहू !!!'

तो स्वर ऐकून खिडकींतल्या दोघांनींहि एकमेकांकडे पाहायच्याऐवजीं तो स्वर कुठून येतो आहे इकडेच लक्ष दिलें.

—हळूहळू अंधार पसरूं लागला.

—नंतर दिवे लागले.

—त्या एकमेकांच्या अंतःकरणांतहि कसल्या तरी वासनेची मिणमिण करणारी पणती पेटली.

* * *

—तिचें नांव मंदाकिनी.

—शरीर काठीसारखें. वर्ण काळा.

—सुरूपांत जमा न होणारी. कठोरपणानें बोलायचें तर कुरूपच !

—केस कुरळे.

—पण डोळे मात्र सतेज व चंचल !

—आणि आवाज कोकिळेसारखा !

—थोडक्यांत सांगायचें म्हणजे मानवी देहांतील ती कोकिळाच होती !

—ती कुरूप खरी; पण तिच्या अंगविक्षेपांत एक प्रकारचा जिवंतपणा होता !

—सळसळत जाणारी नागीण. क्षणांत चमकणारी पण तेवढ्यामुळें लक्षांत राहणारी विद्युल्लता.

—अशी ती मंदाकिनी.

आणि वसंत तर हजारांत देखणा ! गरुडासारखें नाक. प्रशान्त घारे डोळे गुर्मीत असल्यासारखें थोडेंसें वाटणारें चेहऱ्यावरचें नेहमींचें मिस्किल हास्य ! वृत्तीचा बेदर्दपणा ! कॉलेजचें आयुष्य चाललेलें असल्यामुळें थोड्याशा बेजबाबदारपणाच्याच भावनेवर तरंगणारीं अगणित मनोराज्यें आणि त्या मनोराज्याचेंच चेहऱ्यावर उमटणारें मनोवेधक प्रतिबिंब !

—कसलेलें शरीर आणि गंगेच्या पाण्याला गंगेच्याच पाण्यानें आंघोळ घातल्याप्रमाणें रोज अंग कसतांना घामानें होणारी आंघोळ—

—चेहऱ्यावर एक प्रकारचा अतृप्तपणा !

—एखाद्या तरुणीलाच मोह घालील असा नव्हे, तर कुणालाहि असलें शरीर हिंदुस्थानच्या मालकीचें आहे याबद्दल अभिमान वाटावा. बहिणींना हा आपला भाऊ असावा असें वाटावें, वृद्ध माउलींनीं मुलगा म्हणून आशीर्वादाचा उच्चार करावा, वृद्धांना ही आपली म्हातारपणची काठी असावी असें वाटावें, असा तो वसंत होता.

—पण त्याला पहिली हाक प्रणयाचीच ऐकूं आली !

वास्तविक वाटेल त्या कर्तव्याच्या हाकेला 'ओ' देण्याच्या तयारींत असणाऱ्या तरुणाला पहिली हाक 'प्रणयाचीच' ऐकायला येते—ऐकविली जाते !

—आणि त्या एका हाकेनेंच तरुणांच्या इतक्या कानठळ्या बसतात, कीं त्यामुळें त्यांना पुढें कांहींच ऐकायला येत नाहीं !

आज चार-आठच दिवस झाले होते. मंदाकिनी वसंताच्या खोलींत बसून अत्यंत मोकळेपणानें व आपल्या गोड गळ्यानें आपल्या आवडीच्या कविता म्हणत होती. तिला टिळकांची कविता फार आवडे.

आतां ती म्हणत होती—

**नर्तना ।**
**हर्ष-वर्तना ।**
**करी ना प्राणी—नच दुजा अभागी त्यासम जगतीं कोणी !॥**

—वसंत एकतानतेनें तिच्याकडे पाहत होता.

—तिच्याकडे पाहण्यासारखें काय होतें ?

—पण वसंत किती कुतूहलानें तिच्याकडे पाहत होता !

—इतक्या मधुर आलापानें मनाला मोह पाडणारें गीत म्हणणारी मंदाकिनी– किती कुरूप– किती काळी –आणि तिच्याकडून निर्माण होणाऱ्या नादलहरी किती बिनमोल ! या विरोधाबद्दल तो एका क्षणीं परमेश्वराची निंदा करी तर दुसऱ्याच क्षणीं तो परमेश्वराचें कौतुक करी !

" मंदाकिनी–मंदाकिनी–" मनांतल्या मनांत तिच्या नांवाचा उच्चार करीत वसंतानें खिडकीबाहेर पाहिलें !

" बरं आहे. जातें हं आतां, का फिरायला येणार आहांत आपण ? " मंदाकिनीनें विचारलें.

" फिरायला येऊं म्हणतेस ? चल—जाऊं या हवं असलं तर ! "

दोघेंहि फिरायला म्हणून बाहेर पडलीं.

* * *

अलीकडे ती नेहमींच फिरायला जात.

—जातांना त्यांची कोणीहि टिंगलटवाळी केली नाहीं !

—लोक समजत तीं बिचारीं सख्खीं बहीणभाऊ आहेत !

—कारण इतक्या कुरूप पोरीला घेऊन कोण एवढ्या उत्कंठेनें फिरायला जाणार ?

* * *

मध्यंतरीं चार महिने गेले.

वसंत आणि मंदाकिनी ही जोडी नेहमीं बरोबरच असे.

एक दिवस मंदाकिनीच्या वडिलांनीं अत्यंत आस्थेनें वसंताच्या गृहपरिस्थितीची चौकशी केली.

त्या वेळीं वसंत मिस्किलपणें हसत होता.

त्याच दिवशीं संध्याकाळीं आपल्या खोलींत येतांच वसंतानें मंदाकिनीला विचारलें, " काय ग, आज तुझे वडील माझी फारशी चौकशी करीत होते ? "

" ते वेडे आहेत ! " मंदाकिनीनें उत्तर दिलें.

" वेड्या वडिलांची ही शहाणी मुलगी हें उत्तर देत आहे वाटतं ? " वसंत म्हणाला.

" पण तुम्हांला काय करायचं आहे त्याच्याशीं ? मोठीं माणसं नेहमीं अशींच चौकशी करतात—" मंदाकिनीनें कांहींसें गोंधळलेल्या स्वरांत उत्तर दिलें.

" सगळींच मोठीं माणसं नाहीं अशा चौकशा करीत; ज्यांच्या मुली लग्नाच्या आहेत अशीं मोठीं माणसं ! खरं ना ? " वसंतराव उत्तरले.

" उगीच चौकशी केली त्यांनीं, आपली चौकशी करून आम्हांला काय फायदा ? "

मंदाकिनी आपल्या हाताचीं बोटें पांचच आहेत ना हें पुनः पुन्हा मोजून पाहत होती !

वसंतानें पुन्हा मिस्किलपणानें विचारलें, " नाहीं पण, खरंच कां चौकशी केली त्यांनीं ? "

" सांगितलं ना एकदां उगाचच म्हणून ! पुनः पुन्हा काय विचारतां तेंच तेंच. मी आपली जातेंच मुळीं ! " असें म्हणून मंदाकिनी खरीच जाऊं लागली पण वाटेंत एकदां अडखळली. एकदां तिचा ओचा तिच्या पायांत अडकला. पण ती गेली ती मात्र हसत हसत गेली !

* * *

वसंत आपली मुलगी पत्करील अशी मंदाकिनीच्या वडिलांना यत्किंचितहि आशा नव्हती ! पण त्यानें आनंदानें मान्य केलें.

—प्रेम बसून लग्न झालेलीं अनेक जोडपीं मीं पाहिलीं आहेत. प्रेमाला सौंदर्याची जोड असावीच लागते असें कांहीं त्या जोडप्यांकडे पाहून मला वाटत नाहीं !

—प्रेमाला सौंदर्यापेक्षां-परिस्थितीच जास्त जबाबदार असते !

—पण जी मंदाकिनी आतांपर्यंत आपल्याला कुरूप समजत असे ती वसंतनें होकार देतांच स्वतःला सौंदर्यशालिनी समजूं लागली !

—ती आतां नटामुरडायला लागली होती !

—हा पोलका का तो ब्लाऊज ? हें पातळ का अशी केशरचना ? हे प्रश्न आतां तिला गोंधळून सोडूं लागले. त्या प्रश्नांचीं उत्तरें बेळीं ती वसंतालाहि विचारूं लागली.

—अशा प्रश्नांचीं उत्तरें द्यायला वसंत टाळाटाळी करी व अखेर मंदाकिनीनें फारच बेजार केलें तर गंभीरपणानें खिडकीबाहेर पाहत तो म्हणे—

**" एक तुझा स्वर। आर्त खरोखर। वाटे मज बिनमोल् ! "**
**—कोकिळे ऐकव तव मधु बोल ! "**

वास्तविक एखाद्या वैशिष्ट्याच्या आपल्या आवडीकरितां सुद्धां आपल्याला कितीतरी स्वार्थत्याग करावा लागतो !

चित्रप्रदर्शनांत ७×१० च्या एखाद्या चित्रावर किंमत लिहिलेली असते, " साडेसातशें रुपये ! " त्यावर चित्रकार आचरट आहे असें आपण म्हणतों, पण तें चित्र विकत घेणाराहि कोणी तरी शहाणा असतोच !

—केवळ एका सुस्वर कंठाकरितां इतर बाह्य सौंदर्याच्या लालसेवर वसंताने पाणी सोडलें होतें ! तो त्याचा हेतुपूर्ण त्याग होता !

—आणि तिचे तेजस्वी चंचल डोळे ? एखादी मनोहर तान घेतांना असे कांहीं चमचम करीत, कीं वसंत म्हणे, " बस्स्, एवढंच पुरे ! हिऱ्याच्या खड्यांची किंमत पांच हजार, दहा हजार कितीहि असूं शकते !"

—काव्यप्रांतांत राजेपणा मिरविणारे गुलाब—फुलांचे संस्थानिक—एक पैशाला एक-दोन तर नेहमींच मिळतात, पण वेळीं त्यांच्या सुगीच्या दिवसांत पैशाला पांचपांच सहासहाहि ते मिळूं शकतात !

इकडे मंदाकिनीच्या अंगांत मात्र नवें वारें संचरल्यासारखें झालें होतें. तिच्या अंगांत चांचल्य शिरलें होतें. थोडेंथोडकेंच बोलणारी मंदाकिनी आतां वाटेल त्या विषयांत तज्ज्ञासारखें बोलूं लागली होती. बोलण्यांत तिच्या अंगांत नसलेला अवखळपणा शिरला होता.

इतके दिवस तिची आई तिच्याकरितां जें जें कांहीं करी तें तें तिला पसंत असे; पण अलीकडे 'हें असंच कां ?' 'तें तसंच कां?' 'मला नाहीं बाई असलं आवडत !' 'तूं म्हणजे अशीच !' वगैरे फुसकुल्या ती सोडूं लागली होती !

—कानांत वारें शिरलें म्हणजे वासरूं अनावर होतें ना ?

—वैवाहिक जीवनाचें– आणि जें आपल्या बाबतींत अत्यंत सुखी आहे असें मंदाकिनीला वाटत होतें त्याचें– वारें मंदाकिनीच्या अंगांत शिरलें होतें.

पण—

* * *

वसंताची आई कुणाबरोबर तरी जेजुरीला निघाली होती व पुण्याच्या स्टेशनवरून वसंताला तिच्याबरोबर सोबतीला जायचें होतें.

—दोनचार दिवसांत वसंत आईबरोबर जेजुरीला जाऊन आला.

—मंदाकिनीच्या वडिलांनीं वसंताच्या वडिलांकडून लग्नाचा होकार चार-आठ दिवसांपूर्वीच आणविला होता.

—मंदाकिनीच्या वडिलांनीं वसंताला व त्याच्या आईला एक दिवस मुद्दाम मध्यें पुण्यास ठेवून घेण्याचा आग्रह केला होता.

—त्याप्रमाणें वसंतानें आईला एक दिवस ठेवून घेतलें.

—वसंताची आई—एकदम काळी—जुन्या थाटाची राहणी. कपाळभर कुंकू वगैरे; वसंतानें या गोष्टींचा विचार कधींच केला नव्हता.

—कुणाचीहि बहुधा आईबद्दल आदराचीच भावना असते !

वसंताची आई वसंताला म्हणाली, "सूनबाई थोडी बुद्धीची अचपळ दिसते आहे–काळी सावळी असें ना का–संसाराला अशीच बायको पाहिजे !"

—कित्येक उद्गारचिन्हें आणि पुष्कळशीं प्रश्नचिन्हें ! त्या चिन्हांअगोदरची विचारी बडबड मला पूर्णपणें माहीत आहे !

—पण वसंताच्या आईचें मत मात्र असेंच होतें !

—असली मुलगी पत्करल्याबद्दल आई आपल्याला मूर्खांत काढील असें वसंताला वाटलें होतें– पण आईची समाधानी वृत्ति पाहून वसंताला आनंद वाटला !

—वसंताची आई गांवीं निघून गेली !

* * *

मंदाकिनी लगेच कांहीं वेळानें वसंताच्या खोलींत आली. वसंताच्या हसऱ्या चेहऱ्यावरून आपल्या सूनबाईबद्दल सासूबाईची पसंती आहे हें मंदाकिनीनें ओळखलें !

—घाईत जसा मनुष्य अडखळून पडतो—

जवळजवळ उन्मादांतच मंदाकिनी लाडांत म्हणाली, "काय हो वसंतराव, उद्यां तुमचं आमचं लग्न झाल्यावर—ह्याच सासूबाईच्या हाताखालीं मी दिवस काढायचे ना ?"

—पायांत अचानक काच घुसावी त्याप्रमाणें चमकून वसंतानें विचारलें, "म्हणजे काय मंदा, शुद्धीवर आहेस ना तूं ?"

आपलें कांहीं तरी चुकलें आहे याची जाणीव मंदाकिनीला झाली. मनुष्य चूक झाकण्याचा प्रयत्न करतो—सुधारण्याचा कधींच करीत नाहीं !

मंदाकिनी आणखी धीटपणानें पुढें म्हणाली, "शुद्धीवर नसायला काय झालं ? आतां आपली आई आहे म्हणून–नाहीं तर काय पण विचित्र ध्यान !"

वसंत ईझीचेअरवरच ताठ बसला व रागीटपणानें म्हणाला, "मंदा, तूं कधीं आरशांत पाहिलं आहेस ?"

मंदेनें आज तोंडाला रंगसफेतीच केली होती. ती वस्त्रालंकारानें नटलेली होती. ती अभिमानानें म्हणाली, "हो-हो, नेहमीं पाहतें हो मी आरशांत ! आणि आपण डोळे उघडे ठेवूनच मला पसंत केलीत ना ? का मी बापाला एकुलती एक आहे आणि माझे बाबा श्रीमंत आहेत म्हणून ?"

—अरेरे ! नाटक–कादंबरींत असलीं ठसकेबाज उत्तरें खुलून दिसतात. व्यवहारांत असलीं उत्तरें म्हणजे जळजळीत निखारे आहेत, हें त्या पोरीला अद्याप माहीत नव्हतें !

वसंत—"मंदा, तूं आज शुद्धीवर नाहींस. घरीं जा पाहूं—"

"इतक्यांतच अधिकार गाजवायला लागलांत वाटतं ? मी सुशिक्षित आहे–हें असं सहन करणार नाहीं मी—"

"बेवकूब मुली, अगोदर घरीं जा–" वसंत चिडून म्हणाला.

—मंदाकिनी आतां थोडी शुद्धीवर आली आणि परतलेल्या डोळ्यांनीं ती जेव्हां आपण बोललेले शब्द पुन्हा वाचूं लागली आणि त्याचा व्यवहारी अर्थ जेव्हां तिला कळूं लागला, तेव्हां तिचे डोळे पाण्यानें भरून आले.

—कांहीं माणसें भांबावलीं म्हणजे आपलीं आवडतीं गाणीं गाऊं लागतात. मंदाकिनी जिना उतरतां उतरतां म्हणूं लागली,

**"पाहिन नंतर वाट जन्मभर, दावुनि चित्त विलोल !"**

शेवटची पायरी उतरतांना तिच्या लक्षांत आलें कीं, आपण "पाहिन नंतर वाट **वर्षभर**" या ऐवजीं **जन्मभर** असें चुकून म्हणालों !

* * *

नंतर दोनचार दिवस वसंत कांहीं मंदाकिनीच्या घरीं गेला नाहीं.

एक दिवस तिच्या वडिलांनींच त्याला चहाला बोलवायला मंदाकिनीला सांगितलें.

—मंदाकिनीनें वडिलांना मधली बोलण्याची कुरबूर कळूं दिली नव्हती.

" तुम्हांला दादा घरीं बोलावताहेत—"

" माझं डोकं दुखतं आहे; मी आज येत नाहीं ! "

" काय झालं डोकं दुखायला ? "

" तुझ्या सौंदर्यानं मी मोहित झालें आहे ! "

" असं घालूनपाडून बोलाल तर-- "

" तुझे वडील मला घरजांवई करणार नाहींत एवढंच ना ?–"

" अजून कुचकं बोलताहांत—"

" तुझ्याशीं लग्न करून ही सौंदर्याची पुतळी अर्धांगी म्हणून हिंडवून स्वतः-ला महामूर्ख म्हणून घ्यायचं ना ? नाहीं; मी आतां इतका वेडा राहिलों नाहीं ! पाहूं ना आतां कोण देवगंधर्व आपल्याला मिळणार आहेत ते ! "

" दुनिया ओस पडली असेल ! "

—काय मनाची रचना आहे पाहा ! मंदाकिनी आली होती वसंताची माफी मागायला, पण उत्तराला उत्तर कसें बेसुमार मिळत होतें !

—मनाचा आणि वाचेचा कांहीं विशेष संबंध नसतो का ?

"—मग तुम्हांला माझ्याशीं लग्न करायचं नाहीं एवढंच ना ? मला फस-वायचा हाच तुमचा हेतु–आपण नाहीं माझ्याशीं लग्न केलंत, तर जशी कांहीं मी जन्माची अविवाहितच राहीन ? " बोलतां बोलतां मंदाकिनीचे शब्द कांपत कांपत यायला लागले होते.

वसंत मिस्किलपणानें हसत म्हणाला, " छेः छेः ! आपलं लग्न हां-हां म्हणतां होईल ! प्रश्न पडणार आहे फक्त माझ्याच लग्नाचा ! "

" खरंच, ठरलेलं लग्न मोडण्याचा का आपला विचार आहे ? तसं असेल तर स्पष्ट सांगा—"

" तूंहि लग्न मोडायला उतावीळ झालेली दिसते आहेस म्हणायची ! "

" हो-हो, झालेंच आहे मुळीं ! माझ्या मैत्रिणी सगळ्याजणी मला चिडवतात, कीं 'अग, कसलं आहे वसंतरावांचं प्रेम—मंदाकिनीच्या बापाच्या इस्टेटीमुळं वसंतराव तयार झाले या कोकिळेशीं लग्न करायला'—बोला हें खरं आहे ना ? "

किती अजागळ मंदाकिनी !

" खरं आहे ना ? " म्हणून विचारतांच कोणी खरेंच सांगतो का ? तीच तर सफाईदार खोटें बोलण्याची उत्कृष्ट संधि असते !

वसंत मिस्कलपणानें हसत म्हणाला, " असं खरं म्हणजे काय, अगदीं धादान्त खरं. मीं सहज गंमत म्हणून लग्नाला संमति दिली ! "

मंदाकिनी—" मग मी घरीं सांगूं का आमचं ठरलेलं लग्न मोडलं म्हणून ? पाहा, पुन्हा आपण बदललांत तरी मी बदलणार नाहीं ! आपली आई काळी आणि वाटेल तशी असली, तरी मला काय त्याचं ? मला वाटलं तें मी सहज बोललें. आपल्याला तेवढंच मनावर घ्यायचं असलं तर खुशाल घ्या ! " आणि अश्रु पुशीत मंदाकिनी पुढें म्हणाली, " इतक्यांत काय गेलं बाई डोळ्यांत कुणास ठाऊक—मोडलं तर मोडलं लग्न—"

—मंदाकिनी निघून गेली.

वसंताच्या मनाची ओढ मंदाकिनीकडे अद्याप होती !

—मंदाकिनी हिरमुसली झाली होती.

मंदाकिनीच्या घरांत अजून कोणालाच कांहीं कळलें नव्हतें !

समोरासमोरच्या खिडकींत एकमेक जेव्हां एकमेकांना दिसत, तेव्हां जे काय एकमेक सुस्कारे सोडीत, तेवढेंच त्या दोघांचें अलीकडचें बोलणें-चालणें होतें !

—वसंत एक दिवस आपल्या खिडकींत उभा होता. खालून मंदाकिनी चालली होती. तिनें सहज वर पाहिलें. वसंत चमत्कारिकपणें हसला.

त्यामुळें मंदाकिनी थोडीशी चिडली.

—ती तडक वर आली.

वसंतानें 'या-बसा' म्हटलें नाहीं.

तरीहि ती ईझीचेअरवर बसली.

—वसंताला बोलायला लावण्याकरितां म्हणा किंवा त्याला खिजविण्या-करितां म्हणा तिनें—

"ऐकव तव मधु बोल, कोकिळे—"

हें साग्र संगीत वन्समोअर न मिळतांच दोन चार वेळ लागोपाठ म्हटलें. वसंत एकाग्रतेनें तिच्याकडे पाहत होता.

—पण त्यानें एक चकार शब्दहि उच्चारला नाहीं.

—मंदाकिनी चिडली. उठून उभी राहिली व म्हणाली, "वसंतराव, माझीं एक-दोन पुस्तकं तुमच्याकडे राहिलीं आहेत तीं मला आत्तांच्या आत्तां पाहिजे आहेत—बोला देणार आहांत कीं नाहीं परत?"

—इतक्यांत वसंतरावाच्या नांवाची तार आली.

"वडील अत्यवस्थ आहेत—ताबडतोब निघून या!"

"कसली आहे तार?" मंदाकिनीनें विचारलें.

तारेचा फॉर्म मंदाकिनीच्या अंगावर फेकून वसंत आपली बांधाबांध करावयास लागला.

"परत केव्हां येणार?"—मंदाकिनी.

"तुझ्या लग्नाचं आमंत्रण आलं म्हणजे!"—वसंत.

"वसंतराव तुम्ही अगदीं वाईट आहांत!"

"आणि तूं?"

वसंत त्याच रात्रीं निघून गेला.

जातांना तो मंदाकिनीच्या घरीं गेला नाहीं!

* * *

—वसंतरावाचे वडील आजारांतून बरे झाले नाहींत.

ठरलेलें लग्न 'लाभलें' नाहीं या सबबीवर वसंताचें आणि मंदाकिनीचें ठरलेलें लग्न मोडलें गेलें.

मंदाकिनीच्या लग्नाचें काय? श्रीमंताची एकुलती एक पोर. तिला वसंतापेक्षांहि सर्व दृष्टींनीं चांगलें स्थळ मिळालें.

इकडे वसंतालाहि मंदाकिनीपेक्षा किती तरी पटींनीं श्रेष्ठ, गुणांत, गाण्यांत, रूपांत चांगली पत्नी मिळाली. त्याच सुशीलाबाई.

— पण, पण—

ती जी एक मंदाकिनीच्या सहवासाची बिजली त्या वेळीं वसंताच्या हृदयांत चमकली त्यामुळें वसंतराव अजूनहि 'ती' आठवण झाली कीं अस्वस्थ होतात ! खिन्न होतात !!

—त्यांचें मन कांहीं तरी संभ्रमांत पडतें !

* * *

ही गोष्ट वसंतरावांनीं आपल्या बायकोला सांगितली,

आणि म्हणाले, " खरंच, ही गोष्ट झाली ही अशी झाली ! हें माझ्या अस्वस्थतेचं कारण ! त्या वेळींहि मंदाकिनीचं जर माझ्याशीं लग्न झालं असतं तर मी मोठासा सुखी झालों असतों असं मला वाटत नव्हतं–आजहि वाटत नाहीं ! बरं मंदाकिनीच्या ऐवजीं आज तुझ्यासारखं रत्न मला मिळालं आहे—पण ती आठवण कांहीं मनांतून नाहींशी होत नाहीं ! –आणि मला वाटतं माणूस आपली जीवननौका ज्या अनेक तऱ्हेच्या सुखदुःखांच्या वल्ह्यांनीं चालवीत असतो त्यांत पूर्वायुष्यांतील आठवणींचं एक प्रमुख वल्हं असावं ! तुला नाहीं असं वाटत ? "

सुशीलाबाई—" मला आपले विचार तुमच्यासारखे जुळवून सांगतां येत नाहींत; पण असं कांहीं तरी असावं खरं ! परवांची मीहि एक गंमत तुम्हांला सांगतें. आपल्या शेजारचे ते आठवले आहेत ना ? आपल्याशीं लग्न ठरण्यापूर्वी माझं लग्न त्यांच्याशीं जवळजवळ ठरत आलं होतं—"

वसंतराव अधीरतेनें म्हणाले, " बरं मग, तें कां मोडलं ? "

सुशीलाः—वडिलांना त्या स्थळापेक्षां आपलं जरा जास्त बरं वाटलं ! आम्ही कांहीं लग्नाअगोदर फिरायला वगैरे नव्हतों गेलों—"

वसंत—" बरं–बरं—"

सुशीला—" तेव्हां सांगायचं काय, परवां मी देवाहून परत येत होतें. तेव्हां ते आठवले आपल्या दोन-चार स्नेह्यांसकट दुकानांत बसले होते. तर त्यांच्यापैकीं कुणी तरी चारगटानं माझ्याकडे पाहत म्हटलं, 'काय बाई सुंदर

आहे–' हें त्या आठवल्यांच्या स्नेह्याचे उद्गार बाहेर पडताहेत तों ते आठवले किती उत्साहानं, अभिमानानं आणि उतावीळपणानं म्हणाले, 'हं– हं– आतां गेली हीच ना– ही तर मला सांगून आली होती !' मी मनांतल्या मनांत खूप हसलें. पण मला आतां पटलं कीं, ते उद्गार म्हणजे त्यांच्या जुन्या आठवणी-चं वल्हं होतं ! पण त्यामुळं माझ्या अंगावर विनाकारणच पाणी उडालं !"

सुशीलाबाई मिस्किलपणानें हसल्या !

आणि वसंतराव—

त्यांनीं कांहींच केलें नाहीं. त्यांना कुठें तरी कामाला बाहेर जायचें होतें. कोट-टोपी घालून ते सरळ बाहेर कामाला निघून गेले.

---

# फितूर : : ४

घराच्या एका सांदीच्या खोलींत बाळ ओक्साबोक्शीं रडत होता; आणि एक सुंदर स्त्री तोंडांतून शब्दहि न काढतां डोळ्यांनीं रोखून व नाकावर 'चूप' म्हणून बोट ठेवून, दाबल्या ओठानें त्याच्या रडण्याला बांध घालीत होती !

बाहेर एका वृद्धेची गांवाला जाण्याची तयारी चालली होती. दाराशीं टांगा येऊन उभा राहिला होता. तिच्या मुलानें त्या वृद्धेचें सामान टांग्यांत टाकलें. ती वृद्धाहि जाऊन टांग्यांत बसली. टांगा चालू होणार तोंच वृद्धेनें ओरडून विचारलें—

" अरे पण, बाळ कुठं आहे ? "

" म्हणजे आतां इथं होताना ? बाळ, अरे बाळ–" पण बाळाची ओ आली नाहीं.

" थांब हं आणतों त्याला–"

तोंच टांगा चालू झाला. वृद्धेनें टांग्यांतूनच ओरडून सांगितलें, " बाळाला नीट जपा हं–"

" हो-हो." मुलानेंहि उसनें हसत म्हटलें. वृद्धेनेंहि तें कृत्रिम हास्य ओळखलें. तिचे डोळे ओलसर झाल्यासारखे तिला वाटले. ते तिनें आपल्या पदराला पुसले व घर शक्य तितक्या लवकर नजरेआड व्हावें म्हणून तिनें आपलें तोंड फिरविलें.

टांगा चालू झाला.

टांगा दृष्टीआड होईपर्यंत मुलगा दरवाजांतच उभा होता. टांगा दिसेनासा झाल्याबरोबर त्यानें एक सुस्कारा सोडला आणि तो घरांत आला.

स्वैंपाकघरांत त्याच्या बाळाची चाहूल त्याला लागली. तो तिकडे गेला. बाळाला जी सुंदर स्त्री न रडण्याबद्दल दटावीत होती, तिनेंच त्याला आतां कडेवर घेतलें होतें. बाळाचें रडें थांबलें होते; पण त्याचें मुसमुसणें मात्र जोर-जोरानें चालूच होतें. ती सुंदर स्त्री त्या बाळाची आई होती; आणि टांग्यांतून बसून गेलेली वृद्धा त्याची आजी होती.

आतां त्याच्या आईनें त्याची खूप समजूत चालविली होती. पण बाळाला आतांपर्यंत याचा कधीं अनुभव आला नव्हता. तर उलट आजीनें त्याची समजूत करावी आणि आईनें त्याला अडथळा आणावा असाच आजपर्यंतचा इतिहास होता.

आजीनें सकाळीं बाळाच्या हातावर कांहीं गोडाधोडाचा खाऊ ठेवला, कीं आईनें त्याच्या हातून हिसकावून घ्यावा आणि म्हणावें "पोटांत जंत नाहीं का व्हायचें?"

आणि आजीनें म्हणावें "मला मुलांचा काय अनुभव आहे? मी वांझोटीच जन्माला आलें. माझीं मुलें मला कुठें झालीं आहेत! दुष्काळांत कोंड्यावर विकत घेतलीं आहेत मीं!"

सणाच्या दिवशीं आजीनें बाळाच्या अंगावर दागिने घातले. पण पांच मिनिटांतच आईनें ते काढून टाकले.

"हल्लीं गांवांत कोण चोऱ्या होत आहेत! दागिन्यांच्या आशेनें माझ्या बाळाला कुणी उचलून नेलें तर?"

"हो तुझ्या बाळाची तुलाच काळजी! आम्ही सर्वजण त्याच्या वाइटावरच आहोंत—!" आजीनें उत्तर द्यावें.

बाळ सारा चार वर्षांच्या उमरीचा होता. पण सकाळीं उठल्याबरोबर तो आजीजवळ तांतडीनें येई. आजीनें त्याला दूध घालूं लागावें तों आईनें म्हणावें "तुमच्या काळीं मुलांना सोसत असतील दुधं—माझ्या मुलांना नाहीं दूध सोसायचं. मी आपला घोटभर चहा पाजतें त्याला!"

आजीनें दुधाची वाटी रागानें दूर सारावी. आईनें बाळाला रडत उचलून न्यावें आणि ती धुसमूस तास दोन तास चाले.

बाळ चारच वर्षांचा होता तरी त्याच्या पाठीमागें त्याच्या आईनें एव्हांपासूनच पाटी-पेन्सिल लाविली होती.

—आणि पाटी-पेन्सिल दिसली कीं, बाळ रडायला लागायचा.

—कालहि तसेंच झालें होतें.

—बाळ रडूं लागला— आजीनें त्याला जवळ घेतलें. पण आईनें तोंडाचा पट्टा सोडला. "आपल्याला काय करायचं मधें पडून. त्याच्या शिक्षणाची काळजी मलाच घ्यायला पाहिजे! ठोंब्या का करायचा आहे त्याला?

—आणि हेंच प्रकरण चिडलें व दहा-पंधरा दिवस विसांव्याकरितां आजी घरांतून बाहेर निघून गेली होती.

—घरांत हें वादळ आज वर्ष-दीड वर्ष चाललें होतें. आईचा राग होता— मुलगा आपला आणि त्याला आजीचा लळा इतका कां असावा? आपण घरांतून बाहेर तास दोन तास गेलों— तरी बाळ आपली आठवण काढीत नाहीं आणि पांच-दहा मिनिटेंच आजी नजरेआड झाली, तर बाळ जीव कासावीस करतो— असें कां?"

—आईला वाटे हा आपल्याविरुद्ध कांहीं तरी कट आहे. तसें आपलें तिच्या मनानें घेतलें होतें; आणि आज सहा महिने तिनें या प्रकरणाच्या प्रतिकारार्थ चळवळ सुरू केली होती.

ज्या दिवशीं बाळाच्या शिक्षणावरून आई-आजीची धुसफूस झाली त्याच दिवशीं संध्याकाळीं देवदर्शनाहून घरांत परत शिरतांना आजीला खालील संभाषण ऐकूं आलें—

"—त्याच मुळीं आपणहून त्याला जास्त लळा लावतात!"

"—मग तुझं काय बिघडलं त्यांत?"

"—पण त्यांनीं माझ्या मुलापुढं असं पुढंपुढं कां करावं?"

"—तुझा मुलगा तो तिचा कुणीच नाहीं का?

" मला नाहीं असलं कांहीं कळत. माझ्या मुलाला नाहीं त्यांनीं असला आणि इतका ळळा लावतां कामा— पोराला लाडावून ठोंब्या का बनवायचा आहे?"

" हो— आईनं माझे लाड करून मला ठोंब्याच बनवला आहे नव्हे का? तेव्हां तुझा मुलगा तरी तूं शहाणा बनव! मीच ठोंब्या—"

" बोला वाटेल तें!"

आणि ती आजी घरांतून निघून गेल्यामुळें बाळाच्या आईला आज खूप समाधान वाटलें होतें. त्या राहतच नाहींत बाहेर फारशा– फार तर महिना पंधरा दिवस– पण तेवढ्यांत बाळाला मी असा ळळा लावतें, कीं– उद्यां आजी आली तरी बाळ त्यांच्याकडे ढुंकून पाह्यचा नाहीं!

––आईचें मनोराज्य!

—बालमनाबद्दल आपली फार गैरसमजूत असते. आपण आपल्याला जितकी अक्कल आहे असें समजतों, आणि लहान मुलांजवळ जितकी कमी गृहीत धरतों तिचें, पुष्कळ वेळेला बारकाईनें पाहिलें तर हें प्रमाण अगदीं उलट असल्याचें आपणांस आढळून येईल.

बाळ रडत होता. आई समजूत करीत होती.

—तो दिवस तसाच धुसफुसण्यांत गेला.

—दुसरा दिवस उजाडला.

––बाळानें आईच्या न कळत आपल्या वडिलांना विचारलें.

" आजी कुठं गेली आहे?"

" गांवाला!"

" केव्हां येणार?"

" पंधरा-वीस दिवसांनीं"

बाळानें आपले डोळे पुसले.

त्यानें आपल्या वागणुकींत समजूतदारपणा धरला. तो आपल्या आईशीं नीट वागूं लागला. एका प्रसंगावरून आईनें म्हटलें सुद्धां "पाहा पाहा आतां माझा बाळ तो! विनाकारण ळळा लावायचा–आणि...काढतो आहे का आतां बाळ कुणाची आठवण?"

" झालं ना तुझ्या मनासारखं ? "

—आठ दिवस निघून गेले होते.

दुपारची वेळ होती. बाळ मिनतवारीनें पाटी-पेन्सिल घेऊन बसला होता. आई त्याला आंकडे शिकवीत होती !

"एकऽ– दोनऽऽ–" आंकड्यांची गाडी पंधरापर्यंत आली होती. " पं–ध–रा बाळानें उच्चारलें. " पं–ध–रा–"

" आणि पुढें ? " आईनें लाडानें विचारलें.

" वीस—" बाळानें उत्तर दिलें.

" गाढवा–पंधराच्या पुढें वीस का रे ? " आईनें कौतुकानें विचारलें.

" हं–" बाळ गोरामोरा चेहरा करून म्हणाला.

" पं–ध–रा–वीस–" बाळ घोकूं लागला.

" पं–ध–रा–काय आणि वीस काय ? "

" पंधरा–वीस दिवसांनीं माझी आजी येणार आहे ! " बाळ पेन्सिल वाटेल तशी पाटीवर घाशीत आईकडे न बघतां म्हणाला.

—आईच्या डोळ्यांसमोर एकदम धुकें पसरल्यासारखें झालें ! तिला वाटत होतें बाळ आजीची आठवण विसरला आहे. पण जखमेवर खपली धरून आंत जखम ओलीच राहावी तशी बाळाची स्थिति असलेली पाहून—आईला कींवहि आली आणि चीडहि आली !

" कार्ट्या, आजी काय रे देते तुला ? आणि मी काय कमी करतें तुझं ? फितूर मेला ! कार्ट्या–खबरदार पुन्हा आजीचं नांव काढलंस तर, काढ आंकडे पुढें–" —बाळानें गोरामोरा चेहरा करून-आंकडे काढायला सुरुवात केली " पंधरा-सोळा-सतरा–" आणि त्यानें पाटी फेकून दिली.

—आतां मात्र बाळाला आईचा लळा खास लागला होता.

—तो हवी ती जिन्नस आईजवळ वाटेल तेव्हां मागे. आणि ती त्याला तत्काळ मिळेही. तो अंगावर दागिने घालून सध्यां रस्तोरस्तीं फिरत होता. आज आठ-दहा दिवस त्यानें पाटी-पेन्सिलीला स्पर्श केला नव्हता. आणि पांच मिनिटेंहि आईला विसंबून तो कुठें फिरत नव्हता !

—आई–आई–आई !

"—तरी माझा बाळ तो !"

आईनें खपीनें म्हटलें.

—आपल्या मुलाचा आतां आईने अदमास घ्यायचा ठरविलें.

"आजी केव्हां येणार बाळाची ?"

"मला काय माहीत ? –येईना वाटेल तेव्हां ! मला काय करायची आहे !" हातांतील सबंध बिस्किटाचा पुडा फोडण्याचा प्रयत्न करीत बाळ म्हणाला.

"तुला नको का आजी ?"

"अं ऽ हं–" दोन बिस्किटें बाळाच्या तोंडांत होतीं.

"—आणि मी ?"

"पाहिजे तर !" बिस्किटाचा पुडा निमा झाला होता.

आतां बाळ आजीचें नांव काढीत नव्हता. आई त्याचे खूप लाड करीत होती. आजीनें बाळाला हवामानापुरते पुरेसे कपडे केले होते. आतां आईनें बाळाच्या कपड्याच्या नक्षत्रमाळा घरांत लाविल्या होत्या.

"अरे बाळ, इथं का हगायला बसायचं ?" स्वैंपाकघरांतच बाळानें तयारी चालविलेली पाहून विचारलें.

"हं ऽ ऽ— मी नाहीं बाहेर जाणार—" विजार कुसकरीत बाळ म्हणाला.

"बरं– बाबा– इथं— "

—आणि तिथेंच झालें.

पण हे सर्व लाड बाळाच्या अंगीं लागलेले मात्र दिसत नव्हते !

—पण एकंदरींत तो खुशींत दिसत होता.

* * *

आज बाळाची आजी येणार होती.

—पण बाळ आपल्या आईला म्हणाला, "आजी वाईट ऽ ऽ आहे ! मला आपली तूंच आवडतेस— " पाठीवर पडून आईच्या पदराशीं खेळत बाळ म्हणत होता.

—आणि आईनें किती समाधानानें त्याच्याकडे पाहिलें म्हणतां ?

—आज बाळाच्या अंगावर सर्व दागिने होते. हातांत खाऊचे पुडेही होते.

" आजीजवळ जायचं नाहीं हं बाळ–" आई बाळाला हळूच सांगत होती.

" उं ऽ ऽ हूं ! ! मला काय करायची आहे आजी ! "

" छान-छान !. त्या आल्यावर तूं त्यांना असंच म्हणून दाखव हं ! "

" ऽ हं हं— "

—तोंच बाळाची आजी आली.

—बाळ पुढें गेला नाही.

—भिंतीला टेकून उभा होता.

—आजी घरांत आली. तिनें बाळाकडे पाहिलें. बाळ स्तब्ध पाहून तिला आश्चर्य वाटलें. दोनचार मिनिटें गेलीं अशींच. आजीचें सर्व सामान घरांत लागलें गेलें. आजीनें एक सुस्कारा टाकला–ती बाळाकडे पाहून– किंचित् हंसली आणि तिनें हाक मारली, " बाळ— "

खडकाचा ढपला उडून--झरा झुळझुळ वाहूं लागावा त्याप्रमाणें झालें. बाळानें किती जलदीनें आजीच्या गळयाला मिठी मारली ! काय जलदीनें तो स्फुंदूं लागला—

—आणि तिकडे त्याच्या आईची कोण निराशा झाली त्यामुळें ! तिनें सगळा राग आंत गिळून सर्दपणानें हाक मारली " –बाळ—"

" चल वाईट आहेस तूं ! आतां तूं नकोस मला– माझी आजी आ ऽ ली ! आ ऽ ली ! ! आ ऽ ली ! ! ! "

" आण तर मग मीं दिलेला खाऊ–आणि अंगावरचे दागिने—"

बाळानें ते सर्व रागारागानें आणि तावातावानें तिच्या अंगावर भिरकावून दिले.

" माणसंच खोटीं मेलीं ! आजी आल्याबरोबर झाला मेला फितूर ! "

अस्पष्ट आवाजांत आई कुणकुणली.

—पण फितुरी कुणी चालविली होती ?

" आली ! आली ! आजी आली ! ! "

बाळ टाळया वाजवीत होता.

आणि केवळ व्यवहार म्हणून–सासूबाईकडे पाहत सुनेनें विचारलें—

" चहा टाकायचा असेल ना ? "

---

# आयुष्यांतील अपघात : : ५

मी आठवण करण्याचा खूप प्रयत्न करतों; पण त्याची माझी ओळख कशी झाली तें मला अद्याप आठवत नाहीं! बाजारांत तयार होऊन पडलेला कपडा एक दिवस आपण विकत घ्यावा आणि मग तो आपला म्हणून आपण वापरीत सुटावें— त्या कपड्याचे धागेदोरे कधीं विणले गेले— त्याचें कापड कधीं तयार झालें— वगैरे इतिहास आपल्याला काय माहीत असतो? तसेंच त्याच्या-माझ्या मैत्रीचे धागेदोरे कधीं विणले गेले, कांहीं आठवत नाहीं!

—मला वाटतें कुठें तरी त्रयस्थ ठिकाणींच कुणाबरोबर तरी तो मला पहिल्यांदा भेटला. त्या माणसाला पाहतांच माझ्या मनांत आपुलकीच्या भावना निर्माण झाल्या—तो कोठें भेटला तें आतां आठवत नाहीं—पहिल्या भेटीला दिवस किती झाले तेंहि लक्षांत नाहीं.

—पण कमींत कमी सात-आठ वर्षें तरी खास झालीं असतील! वहात्या काळाचा मनुष्यदेहावर परिणाम होतो. पण त्या गुलामाला मी सात वर्षांपूर्वी जसा होता तसाच आजहि पाहतों आहे! अगदीं अंगावरच्या कपड्याचे रंग-सुद्धां तेच हं! गोष्ट साधी पण अशक्य वाटेल कुणाला.

—गुलमाची शरीरयष्टि अशी रेखीव आणि बांधेसूत व कमावलेली होती, कीं कोणाचाहि हेवा न करणाऱ्या माणसानें सुद्धां त्याचा खुशाल हेवा करावा! नाक असें कोरबंद होतें—कीं एखाद्या हपूसच्या आंब्याची चाकूनें रेखीव फाक कापावी तसें; आणि तितकेंच तजेलदार आणि रसरसलेलें! तजेलदार घारे डोळे इतके— पण आतां आवरतें घेतों. त्याची सबंध देहयष्टिच असामान्य होती.

—तो बोलायला लागला, कीं अशी मोहिनी पडे, कीं आपण कांहीं बोलायचें ठरविलें असलें तरी त्याचा विसर पडावा आणि त्याचेंच ऐकत राहावें असें वाटे !

—आणि त्याचें माझें आडनांवहि एकच होतें. दोघांच्या वडिलांच्या नांवांचीं आद्याक्षरें एकच होतीं.

—लोकांचा गैरसमज होता, तो माझा भाऊच आहे.

—तो राहत असे पुण्याला, मी असें परगांवीं. आमच्याच गांवीं त्याची-माझी ओळख झालेली, तो महिन्या दोन महिन्यांनीं तरी आमच्या गांवीं येत असे व उतरे माझ्याकडेच.

—आज आठ-दहा वर्षांनीं मी पुण्याला जाण्याचा योग आला होता. पुढच्या आठवड्यांत मी पुण्याला जाणार होतों. तो आज आमच्याकडे आलेला होता.

—मीं सहज त्याला सांगितलें, " मी पुढच्या आठवड्यांत पुण्याला येणार आहे रे बुवा— " आणि मी थांबलों.

" अस्सं ! कां बरेच वर्षांनीं ? " माझ्याकडे चमत्कारिकपणानें पाहत त्यानें विचारलें.

" तसंच कांहीं काम आहे—सात-आठ दिवस तरी राहावें लागेल ! "

—तरी तो मुग्धच.

—माझी अपेक्षा होती, त्यानें 'आमच्याकडेच ये उतरायला' असें म्हणावें म्हणून. पण तसें तो बोलण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां स्वतःची पडती बाजू सावरण्याकरितां मी म्हणालों, " उतरेन कुठेंहि म्हणा— माझे सासरे आहेत पुण्याला— चुलतभाऊ आहे, एक-दोन स्नेही सुद्धां आहेतच— तितक्याच जिव्हाळ्याचे."

तें बोलणें टाळून तो रस्त्यावरच्या खिडकींतून बाहेर पाहूं लागला व एक-दोन मिनिटांनीं चमकून माझ्याकडे पाहत म्हणाला,

" पण मग उतरणार आहेस कुणाकडे ? "

" अजून नक्की ठरवलं नाहीं— "

" पण ठरवलंस म्हणजे नक्की कळव मला; म्हणजे मी भेटेन येऊन तुला तिथं—"

—तो परत पुण्याला गेला. माझ्या मनांत आलें होतें एक वेळ, कीं त्याचा पत्ता आहे माझ्याजवळ—अतिप्रसंग करून त्याच्याकडेच उतरावें. पण मनाला तें पटेना. अखेर मी कुठें उतरणार आहे तें त्याला कळविलें आणि पुण्याला आलों.

* * *

मी नुकताच टांग्यांतून उतरत होतों. तों हा सायकलवरून तिथेंच येत होता. मीं तुसडेपणानें त्याच्याकडे पाहिलें.

तरी हसत तो म्हणाला, " स्टेशनवरच येणार होतों—पण जरा कामांत होतों. तेव्हां शक्य झालं नाहीं—"

मी घरांत जात म्हटलें " अस्सं ! "

—माझ्या पुण्याच्या मुक्कामांत तो जवळ जवळ सकाळपासून रात्रीं आठ-नवापर्यंत माझ्याबरोबर असे.: हा मला एक दिवस जेवायला—निदान चहाला तरी बोलावील अशी आशा: मी आशाळभूतपणानें करीत होतों, पण माझी निराशाच झाली.

—एक दिवस मीं त्याला जिरवण्याच्या उद्देशानें म्हटलें, " जेवायला राहा कीं आज इथंच— घर आपलेंच आहे— पाहुण्याचा पाहुणा म्हणून यायला कांहींच हरकत नाहीं ! "

—पण तो माझ्यापेक्षांहि खमंग ! त्यानें मुकाट्यानें कोटटोपी काढून खुंटीला अडकवीत संमति दर्शविली व म्हणाला, " इथं असं जेवायला राहायचं तर घरीं अगोदर कळवायला पाहिजे वास्तविक; पण केवळ तुमचा माझा लोभ लक्षांत घेतां—"

मीं त्याच्याकडे चमत्कारिक नजरेनें पाहिलें !

वाऽऽ रे लोभ !

—आपल्या घराचा दरवाजा मलं बंद करून, माझ्याबरोबर तिऱ्हाइताच्या घरीं जेवायलं तयार होण्याचा लोभ कांहीं और खराच !

—पण लगेच माझी मलाच कांहीं तरी शंका आली. ठराविक रीती शिकून गणितांतलीं उदाहरणें सोडवितां येतील; पण माणसाच्या मनाचें उदाहरण तसें सोडवितां येणें अशक्य आहे. पुष्कळ वेळेला उत्तर चुकेलच! एरवीं अत्यंत मोकळेपणानें वागणारा हा मनुष्य— आपल्या घरीं मला कां येऊं देत नाहीं?

—कांहीं रहस्य असेल का त्याच्या घरीं?

—आणि माझी तीच शंका बलवत्तर ठरली!

—कारण त्याचे कांहीं स्नेही गेल्या पांच-सहा दिवसांत माझ्या ओळखीचे झाले होते. त्यांचीहि त्याच्याबद्दल हीच तक्रार होती. कित्येकांना तर तो कुठें राहतो हेंही नक्की माहीत नव्हतें व कित्येक म्हणत कीं, 'घरगुती विषय कसाहि आणि केव्हांहि निघो तो एकदम हिरमुसल्यासारखा होतो. त्याच्या घरीं बहुतेक त्याला सुख नसावें. बहुधा त्याची बायको कजाग किंवा ह्याच्या कह्यांत राहणारी नसावी!'

हेंहि उत्तर मला अशक्य कोटींतीलच वाटलें! कारण तो मनुष्य वागणुकीला इतका गोड होता, कीं त्याच्याशीं भांडणें, त्याच्या मनाविरुद्ध वागणें, कुणालाहि अशक्य होतें. त्याच्या समाधानाकरितां कोणीहि आपल्या मनाविरुद्ध वागेल—पण—

—लोकांचें कशाला. माझीच गोष्ट पाहा ना. मी एक तऱ्हेवाईक स्वरूपाचा एकांडा शिलेदार आहे! माझ्या मनाविरुद्ध झालेली क्षुल्लक गोष्ट सुद्धां मला सहन होत नाहीं. एरवीं कुणी मला असें घरीं बोलवलें नसतें तर तेवढ्या कारणाकरितां सुद्धां मी त्याची मैत्री तोडायला तयार झालों असतों. पण याच्या बाबतींत हें सर्व मी सहन करतों आहे!

—मी उद्यां परत आपल्या गांवीं जाणार होतों; आणि आज संध्याकाळीं सहज एकटा कांहीं तरी विचारांत फिरत होतों.

मीं एका घराशीं आलों आणि सहज वर पाहिलें; तों माझा मित्र मला माडीवर उभा दिसला.

मीं चटकन् त्याला हाक मारली.

तो गडबडीनें आपली खुंटीवरची कोट-टोपी हातीं घेत मला खिडकींतून मोठ्यांदा म्हणाला, "थांब हं— मी बाहेरच निघालों आहे—" व तो घाईघाईनें जिना उतरूं लागला.

मींहि आज आगंतुकपणानें त्याच्या घरांत शिरायचें असें ठरवून मोठ्यांदा म्हणालों, " थांबा, आपण पांच मिनिटं तुमच्या घरींच बसूं—"

तो जिना उतरून खालीं ओटीवर येत होता. व मी त्याच्या घरांत शिरत होतों.

आतां त्याचा अगदीं नाइलाज झालेला होता.

मीं सहज समोर पाहिलें.

माजघरांतून कोणी तरी एक बाई ओटीवर येत होती व दोन-तीन मुलें तिच्या अंगाशीं लगट करीत होतीं.

हा पटकन् त्या दरवाजांत जाऊन उभा राहिला व तीं घरांतलीं माणसें मला दिसूं नयेत म्हणून एक हात दाराच्या चौकटीवर ठेवून तो अस्ताव्यस्त उभा राहिला.

—त्यामुळें मीं घरामध्यें जरा डोकावूनच पाहिलें.

—एक अत्यंत कुरूप व कृश अशी बाई व तशींच दोन-तीन मुलें आंत उभीं राहून बाहेर पाहण्याचा प्रयत्न करतांना दिसलीं.

—याच्या संसाराचा 'कोंडवाडा' आहे तर! मनांत अशी कांहीं तरी कल्पना आल्यामुळें मी गालांतल्या गालांत हसत मुकाट्यानें जिना चढून वरच्या खोलींत जाऊन बसलों.

तो माझ्याकडे खजिलपणें हसत पाहत होता.

—वर माडीवर आलों. माडी किती व्यवस्थित व सुसज्ज होती म्हणतां. पण सुसज्जपणाचा झोक रंगेलपणाकडे नव्हता— उदात्तपणाकडे होता.

—मी तिथल्या एका खुर्चीवर बसलों; पांच-दहा मिनिटें गेलीं. तो अद्याप वर आला नव्हता. माझ्या मनामध्यें त्याच्या संसाराबद्दलचे विचार नाना वाटांनीं धावूं लागले होते व ते मी आवरीत होतों. कारण विचार केला, कीं जें आतां मला प्रत्यक्ष कळणार आहे किंवा मी कळवून घेणार आहे त्याबद्दल कल्पना कशाला!

—तो दबकत दबकतच वर आला. आल्याबरोबर माझ्याकडे पाहून पुन्हा एकदां ओशाळलेला हसला; स्थिरस्थावर व्हायला पांच मिनिटें लागलीं त्याला. अखेरशेवटीं लाजून खालीं पाहत तो मला म्हणाला—

"अगदींच लगट केलीत आपण—तुम्ही माझ्या घरीं येऊं नये-तुम्हीच काय पण कुणीच माझ्या घरीं येऊं नये अशी माझी नेहमीं इच्छा असते—"

—"बरं जातों तर मग मी." मी ताडकन उठून म्हणालों.

"बसा आतां. तुम्ही माझ्याशीं किती मोकळेपणानें आणि प्रेमळपणानें वागतां याची मला पूर्ण कल्पना असल्यामुळें, आपला हा आजचा अतिप्रसंग मीं सहन केला. आणि शिवाय एखादें रहस्य संपूर्ण असतें तेव्हां त्याची किंमत असते-तें अर्धेंअधिक माहीत असणें धोक्याचें असतें. तसें माझें संसार-रहस्य कांहींच नाहीं. मीं तें रहस्यासारखें बनविलें आहे—"

"कारण?" मीं कुतूहलानें विचारलें.

"आपण खालचीं माणसें पाहिलींतच-जिला तुम्ही कुरूप म्हणणार आहांत ती माझी पत्नी— आणि तसलींच जीं मुलं तिला बिलगून होतीं तीं माझीं अपत्यें—" तो लाजला.

"महामूर्ख आहेस तूं! तुझ्या बायकोला सुरूप आणि कुरूप ठरविणारा मी कोण? तुला ती आनंद देते ना?"

"निरवालस! आणि अनिर्वचनीय! —पण माझ्या रेखीवपणावरून माझ्या घरच्या संसाराची जे लोक कल्पना करतील ते फसतील, म्हणून मी घरीं कोणालाच येऊं देत नाहीं—"

"पण हा जगाचा नियमच आहे. सुंदर पुरुषाला कुरूप बायको आणि कुरूप पुरुषाला सुंदर बायको—" मीं सांत्वन करण्याच्या अभिनिवेशानें म्हटलें.

पण तो म्हणाला, "हा माझ्या आयुष्यांतील अपघात आहे!"

"काय अपघात?"

"होय—!"

"तो कसा काय?"

"आमचें संगमनेरला सत्तेचें घर होतें. आमचे वडील श्रीमंत होते. ते मला लग्न करण्याकरितां गळ घालीत होते, आणि मी नाकारीत होतों. ही जी आतां माझी बायको झाली आहे ना- त्या मुलीचें बिऱ्हाड त्या वेळीं आमच्या वाड्यांत होतं. माझ्या लग्नाच्या वाटाघाटी चालल्या होत्या आणि मी लग्नाला तयार नव्हतों. तिचे वडील मात्र तिच्या लग्नाकरितां वर्षभर जोडेफाड करीत

होते– तीहि लग्नाला तयार होती; पण तिचे लग्नच जमत नव्हतें. एक दिवस ती दरवाजांत उभी होती— मी बाहेरून आलों— मीं सहज तिच्याकडे पाहिलें आणि मिस्किलपणें हसलों. तिनें त्या वेळीं माझ्याकडे रागानें पाहिलें मी लाजलों. —ती आंत गेली— मी माझ्या घरीं आलों; आणि पांच मिनिटांतच तिच्या वडिलांचें मला बोलावणें आलें— मी मनांतून थोडासा घाबरलोंच— मला वाटलें 'काट्याचा नायटा' व्हायला लागला आहे— मी जाण्याचें टाळणारच होतों; पण मन आवरून गेलोंच तिच्या वडिलांकडे— तिच्या वडिलांचें आणि माझें विशेष असें कांहींच बोलणें झालें नाहीं— त्यांनीं मला लग्न कां करीत नाहीं असें विचारलें— मला वाटलें ते आपल्या मुलीबद्दल मला विचारीत आहेत म्हणून— याच वेळीं ही मुलगी दारांत उभी होती—मीं तिच्याकडे पाहून मुद्दाम हसत म्हटलें, 'मुलगी मनासारखी मिळत नाहीं म्हणून—' पण आतां तिनें माझ्याकडे रागानें पाहिलें नाहीं. —एवढेंच काय, पण ती माझ्याकडे पाहून किंचित् हसलीच— मी घरीं आलों.

नंतर चार-पांच दिवसांत आम्हीं एकमेकांनीं दिसल्याबरोबर—मिस्किलपणानें हसायचें असें ठरल्यासारखें जणूं झालें होतें. एक दिवस मी असा माडीवर उभा होतों; ती खालीं दरवाजांत उभी होती. तिनें मुद्दाम वळून माझ्याकडे पाहिलें, मी हसलों. माझ्या हातांत त्या वेळीं सोनचांफ्याचें फूल होतें. आजूबाजूला कोणी नाहीं असें पाहून कोणतीहि कल्पना मनांत नसतांना मीं तें तिच्याकडे सहज फेंकलें— तिनेंहि तें घेतलें— आणि याच वेळीं आमच्या मातोश्री देवाहून घरीं येत होत्या— त्यांच्या तें दृष्टीस पडलें वाटतें— आणि— नंतर येणाऱ्या पहिल्याच पहिल्या तारखेला त्या मुलीचें बिऱ्हाड आमचा वाडा सोडून गेलें. माझ्या वडिलांनींच त्यांना बिऱ्हाड सोडायला सांगितलें होतें. नंतर वडिलांनीं ताबडतोब लग्न करून घ्यायचा मला हुकूम सोडला. मींहि संमति दर्शविली व मुली पाहूं लागलों. एका ठिकाणीं माझें लग्न— ठरणार होतें— त्याच्या अगोदर कांहीं तासच माझ्या कानांवर बातमी आली– आमचा वाडा सोडून गेलेल्या त्या मुलीचें ठरलेलें लग्न मोडलें आहे व— कारण माझा आणि तिचा कांहीं वाईट संबंध होता अशी गांवांत अफवा पसरली होती. माझें मन अस्थिर झालें. मीं धीट होऊन ही हकीकत माझ्या वडिलांच्या कानांवर

घातली व 'माझ्यामुळें एका मुलीच्या जन्माचें नुकसान व्हायला नको— मी तिच्याशींच लग्न करणार' असें सांगितलें. हें ऐकतांच वडील रागांत म्हणाले,

" छान-छान ! आमची शंका खरीच तर मग— तुला इतका मोकळा मी होऊं देणार नाहीं." पण— मीं ऐकलें नाहीं. मी त्याच मुलीशीं लग्न करण्याचा हेका धरला, दोन-चार दिवस घरांतील वातावरण गरम झालें. रडारडी झाल्या. वडिलांनीं मला घरांतून हाकून द्यायचें ठरविलें. पण आई— आईनें हुंदके देत सांगितलें कीं, त्याला घराबाहेर काढायचा असला तर खुशाल काढा—पण त्याचे दोन हातांचे चार हात करून द्या, आणि— अखेर माझें लग्न त्या कुरूप मुलीशींच झालें—आज जी माझी बायको आहे......लग्न होतांच मला वडिलांनीं घराबाहेर काढलें. माझे नातेवाईक 'कसली घाण पत्करली' म्हणून मला स्पष्ट-अस्पष्ट बोलूं लागले. मीं कर्तव्याच्या भावनेनें लग्न केलें होतें. पुढें येथें येऊन बिऱ्हाड केलें. तरी मी कर्तव्यच करीत असल्याची माझी कल्पना होती; आणि तेव्हांपासूनच आपलें हें गृहच्छिद्र बाहेर पडूं नये म्हणून, मी कोणालाहि घरीं येऊं देत नाहीं...!"

" पण आज आतां ती कर्तव्याचीच भावना राहिलेली दिसत नाहीं." मी उद्‌गारलों.

" छेः-छेः ! वास्तविक 'प्रेम' या शब्दाचा मला तिटकारा आहे म्हणूनच मी प्रेम हा शब्द वापरीत नाहीं—पण मी अत्यंत सुखी आहे ! सौंदर्य म्हणजेच स्त्री असें बहुशः समजतात; पण माझी बायको कुरूप असून तिचें विचार-सौंदर्य—वागणुकीचें माधुर्य, इतकें अलौकिक आहे, कीं सौंदर्यानें भरलेल्या जगांतून भटकतांना सबंध दिवस काढला तरी मनाला जें समाधान वाटत नाहीं, तें घरीं आल्यानंतर पांच मिनिटांत मला वाटतें ! माझ्या आयुष्यांत हा अपघात झालेला असला, तरी आतां तो अपघात गोडच वाटतो. आणि माझ्या घराचें दार मीं स्नेह्या-सोबत्यांना बंद केलेलें असल्यामुळें—आमच्या खाजगी जीवनांत कसलाहि कलकलाट निर्माण होत नाहीं. घरीं आलों कीं शांत—शांत—"

इतक्यांत त्याची बायको चहाचे दोन पेले घेऊन वर आली. किती शांत आणि समाधानी दिसली ती. माझ्यापुढें चहाचा कप ठेवून तिनें एकवार आपल्या पतीकडे पाहिलें आणि पदर बांधून मला नमस्कार करीत म्हणाली " भाऊजी— नमस्कार करतें हं !"

---

# जुन्या वस्तु : : ६

" हॉऽ हॉऽ हॉऽ ! ! ! काय म्हणतां काय काकू तुम्ही ? तुमच्या मुलीशीं मी लग्न करूं ? करीन हं– तशीच वेळ आली तर दुसरा काय इलाज आहे मग ? पण तूर्त तरी कांहीं शक्य दिसत नाहीं—" अद्याप दिवाकर हसतच होता.

काकूंची मुलगी करुणा आपल्या तोंडावरचें कारुण्य लपविण्याकरितां, दिवाकरानें हेटाळणीनें हंसायला सुरुवात करतांच, बाहेर गॅलरींत जाऊन उभी राहिली ! काकूहि भलत्याच शरमल्या. दिवाकरला आपली मुलगी देऊं करण्यांत त्यांनीं कांहीं फारशी चूक केली होती असें त्यांना वाटत नव्हतें. पण दिवाकराचें हसणें आणि उर्मटपणाचें उत्तर ह्यांनीं त्या फारच खजील झाल्या. दिवाकरला त्यांनीं चहाला बोलावून आज हा विषय काढला होता. तो चहा तयार होऊन पडला होता. त्यांची मुलगी करुणा आज दिवाकरला चहा देण्याकरितां आधीं-चीच स्वच्छ कपबशी आपल्या पदरानें पुसून जास्त स्वच्छ करीत होती, तोंच दिवाकर उर्मटपणानें हसला. करुणेनें दिवाकरकडे चमत्कारिक रीतीनें पाहिलें. दिवाकरचीं पुढचीं वाक्यें तिला ऐकायला आलीं.

तिच्या हातांतून खळकन् बशी पडून फुटली. तिच्या मनांतलें स्वतःच्या लग्नासंबंधाचें मनोराज्य असेंच मनांतल्या मनांत खळकन् पडून फुटलें होतें. राहिलेला कप आईपुढें ठेवीत ती शरमिंध्यासारखी बाहेर गॅलरींत जाऊन उभी राहिली होती.

दिवाकर जाऊं लागला—

शरमिंध्या झालेल्या काकू माणुसकी सांभाळण्याकरितां म्हणाल्या, " दिवाकर, आमची चूक झाली तुम्हांला असें विचारण्यांत, पण असे कोरडेच जाऊं नका–चहा घेऊन चला. करुणा, कुठें गेलीस ग बाई– थांबा हं, मी देतें चहा तुम्हांला. करुणे, दुसरी नाहीं का ग बशी–" काकूंनीं चहा दिवाकरापुढें ठेवला.

आतां दिवाकर किंचित् शुद्धीवर आला होता. आपण उत्साहानें हसत असतां समोरच एखादा रडायला लागला तर आपल्या हसण्याचे पदर थोडेसे तरी चुरगाळले जातात. तसेंच दिवाकराचें झालें. तो किंचित् गंभीर होत चहा घेण्याकरितां स्वतःच भिंतीशीं उभा असलेला पाट घेऊन त्यावर बसला. आपण उर्मटपणानेंच बोलून गेलों हेंहि त्याला आतां मनोमन पटलें होतें. तो पाटावर बसतांच त्यानें सहज बाहेर पाहिलें.

—करुणा डोळ्यांत आंसवें आणून हिरमुसली उभी होती.

—तें दृश्य त्याला पाहवेना. काकू अत्यंत गंभीरपणानें आपला एक ओठ दातानें दाबीत–जणूं त्या स्वतःचा मनोरथच कुरतडीत आहेत अशा भावनेनें–चहा कपांत ओतीत होत्या.

—तेंहि पाहून दिवाकरला कसेंसेंच झालें.

" हं– काकू, माझी गोष्ट सोडून द्या–पण मी पाहतों अं करुणेच्या लग्नाचं कुठं तरी—"

" कशाला त्रास घेतां आपण विनाकारण. तिचं नशीब आणि ती." दिवाकरनें चहाची बशी ओठाला लाविली होती.

चहाचीं भांडीं जाग्यावर ठेवीत काकूंनीं विचारलें,

" साखर हवी आहे का चहांत ?—"

दिवाकर काय पीत आहे हेंहि त्याला कळत नव्हतें इतका तो गांगरला होता. त्यानें कसाबसा चहा संपविला आणि तो काकूंच्या घरून बाहेर पडला. जातांना त्यानें सहज मागें वळून पाहिलें.

किती खिन्न मुद्रेनें करुणा उभी होती तिथें !

करुणेच्या आईला त्या प्रसंगाचें कांहींच वाटलें नाहीं. असा आशाभंग हा तिचा नित्याचाच सोबती होता. ऐन तारुण्यांत एक पोरगी सोबतीला देऊन काळानें तिचा संसार संपविला होता. ती पोरगी आज लग्नाला आलेली होती.

उपजीविकेचें साधन म्हणून काकू दुसऱ्याच्या इथें स्वैंपाक करीत होत्या. अर्थात् करुणा ही स्वैंपाकणीची मुलगी ठरली. तशी करुणा सौंदर्याच्या बाजारांत पहिल्या नंबरची मुलगी ठरली असती. पण तिच्या सौंदर्यानें बाजारीपणा धारण केलेला नव्हता. रंगवून-सजवून सौंदर्याचे ताबूत जे रस्त्यानें अनेक दिसतात तशी ती नव्हती. आणि हेंच दिवाकराला ती नापसंत ठरण्याचें कारण नव्हतें तर मनामध्यें ज्या कांहीं आडमुठ्या समजुती घर धरतात त्याप्रमाणें दिवाकराचें झालें होतें. श्रीमंतांच्याच मुली फक्त सुंदर असतात असा त्याच्या मनाचा ग्रह झालेला होता. अर्थात् हें वाक्य त्याला पटलें नसते. पण त्याला श्रीमंताची मुलगी पाहिजे होती.

—पण तो स्वतः कांहीं श्रीमंत नव्हता. तोहि असाच एक जगांत उघडा-वाघडा पडलेला प्राणी होता. जवळचें असें आप्तेष्ट कुणीच नव्हतें त्याला. परिस्थितींतून पोहत पोहतच तो आज स्वतःच्या पायांवर उभा राहिला होता. त्यामुळेंच त्याच्या स्वभावांत थोडीशी मगरुरी आली होती. वार लावून, शिकवण्या शिकवूनच तो बी. ए. झाला होता. अर्थात् तो एका शाळेंत मास्तर होता. पन्नास रुपये पगार होता त्याला.

त्या वर्षी तो बी. टी. ला जाणार होता.

तो स्वभावतःच हुशार होता. त्याला तालमीचा छंद होता. तो अत्यंत देखणा होता. त्याच्या बोलण्यांत नर्म-विनोद फार असे.

काकू आणि तो मुंबईला एका चाळींतच राहत असत. एकमेक एकमेकांची परिस्थिति जाणून होते. त्यामुळेंच काकूंनीं दिवाकरला करुणेबद्दल शब्द टाकला होता. पण त्यांत दिवाकरला स्वतःचा काकूंनीं भयंकर अपमान केल्यासारखें वाटलें.

" स्वैंपाकणीची मुलगी आणि आपण करणार ? काकूंनीं केवढी अमर्यादा केली आपली ? माझ्याकडे त्या येत-जात—आजारीपणांत माझी वास्तपुस्त करीत, त्याचा हाच अर्थ होता का ? ऑ—हॅ ! एकूण माझ्याशीं असें आस्थेनें वागण्यांत त्यांचा स्वार्थ होता तर ?—"

पण प्रत्येक माणसाची बहुतेक हालचाल स्वार्थाचीच नसते का ? स्वार्थाच्या चाहुलीनेंच माणूस आजूबाजूला पाहत नसतो का ?

पण दिवाकर मात्र स्वार्थाकरितां आचरटपणानें आपल्या आवाक्यांतील सावलीचीं ठिकाणें न पाहतां अस्मानांत पाहत, चालला होता ! एखाद्या मुलीची शिकवणी मिळाली, कीं दिवाकर [illegible] रुपये कमी घेऊन ती पत्करी. त्याला वाटे; शिकवणीकरितां घरांत शिरलेले कांहीं मास्तर जसे जांवई म्हणून त्या घरांतून बाहेर पडतात, त्याप्रमाणें—

—पण अपवादाला नियम म्हणून कवटाळण्यांत पुष्कळ माणसें चुकतात. जगांत सामान्य माणसें फार असतात, आपणहि त्यांतलेच आहोंत हें पुष्कळ माणसें ओळखीत नाहींत. त्यांच्या बुद्धीवर कसल्या तरी कल्पनेचा अंमल बसलेला असतो. म्हणून ते स्वतःला असामान्यांच्या यादींत घालीत असतात. दिवाकराचें असेंच होत चाललें होतें. श्रीमंत मुलींनीं त्याला पत्करावें असें त्याला वाटत होतें– कारण तो तसा सद्गुणी होता. पण त्याच वेळेला दिवाकराला असा मात्र कधीं विचार सुचला नाहीं, कीं त्याच सद्गुणाच्या आणि सुबत्तेच्या जोरावर काकूंनीं—एका स्वैपाकणीनें—आपली मुलगी दिवाकरला सांगितली, तर त्याला कां अपमान वाटावा ?

काकू दुसऱ्याच्या घरीं स्वयंपाक करीत— त्या त्यांतल्या तज्ज्ञ होत्या.

तूंहि पुस्तकी ज्ञानाचा तज्ज्ञ म्हणून दुसऱ्यांच्या मुलांच्या शिकवण्यांच्या रूपानें त्यांच्या अभ्यासाचा स्वैंपाक करून देत नव्हतास तर काय करीत होतास ?

दिवसांमागून दिवस जात होते. दिवाकराच्या लग्नाचा पत्ता नव्हता. आतां त्यानें स्वतःच प्रयत्न करण्याचें ठरविलें होतें. एक-दोन ठिकाणचे त्याचे हे प्रयोग त्याच्या अंगावरच आले. एकदोन ठिकाणच्या त्याच्या वागणुकीनें त्याच्या स्वभावालाहि थोडासा हिणकसपणा आला.

—एकदोन ठिकाणीं याची ये-जा चालू झाली. आपल्या दाराशीं येणारा प्रत्येक तरुण प्रेमयाचनेकरितां येत आहे, अशी प्रत्येक विवाहेच्छु मुलीची तरी कशी कल्पना होणें शक्य आहे ?

—ती एखादे वेळेला सहज हसली असेल— पण दिवाकरानें काय अर्थ घ्यावा— प्रेमाची राजापुरी गंगा उमटली म्हणून ?

ती सहज मोकळेपणानें वागली असेल याच्याशीं— पण त्याचा दिवाकरानें काय अर्थ घ्यावा? ही आपल्याशीं लग्न करायला तयार आहे म्हणून?

—पण आशाळभूत!

—शेवटीं दिवाकरानें त्या मुलीच्या वडिलांपाशीं गोष्ट काढली. बाप आश्चर्यचकितच झाला.

—काकूंनीं दिवाकराजवळ आपल्या मुलीबद्दल गोष्ट काढतांच तो जसा आश्चर्यचकित झाला होता तसाच!

—स्वैंपाकणीची मुलगी कशी करावी हा दिवाकराला अपमान वाटला, पण त्या मुलीचे वडील म्हणाले—

"आज तुम्हीं माझ्या मुलीला मागणी घातलीत—उद्यां एखादा देखणा आचारीसुद्धां असलें धाडस करील!"

—दिवाकरानें निराश करतांच करुणा खजील होऊन कावरी-बावरी झाली. त्या मुलीच्या वडिलांनीं असें म्हणतांच—

—दिवाकरानें काय केलें असेल?

त्यानें तिच्या वडिलांना दम दिला. "आपण आपल्या मुलीजवळ चौकशी करा या गोष्टीबद्दल— तिचें माझ्याशीं लग्न करून देणें अपरिहार्य आहे असें आपणांस आढळून येईल!"

तिच्या वडिलांनीं दिवाकराला सांगितलें, "तशीच वेळ येणार असली, तर तिचा गळा दाबून प्राण घेईन मी!

* * *

—असेंच एक-दोन ठिकाणीं झालें. दिवाकर आपल्या लग्नाविषयीं आतां नाउमेद झाला होता. पण अद्याप त्याला श्रीमंताची मुलगी पाहिजे होती!

करुणेचें बिऱ्हाड अद्याप त्या चाळींतच होतें. तीहि अद्याप अविवाहितच होती! दोघांच्याहि लग्नाचे निरनिराळ्या ठिकाणीं प्रयत्न चाललेच होते— आणि प्रत्येकाला बाहेर अपयश भेटलें कीं, प्रत्येकजण मनांतल्या मनांत कल्पना करीत— शेवटीं कदाचित् दिवाकरशीं जमेल— किंवा अलीकडे दिवाकरहि मनांत कल्पना करी, कीं करुणा काय वाईट आहे?

—अपयश आवडवून घ्यायची जगाची रीतच आहे!

* * *

अशा तऱ्हेनें दोनचार वर्षें मधें निघून गेलीं होतीं. दिवाकरची आतां स्वतःच्या लग्नाबद्दलची आतुरता भयंकर वाढली होती ! सर्व बाजूंनीं तो अत्यंत निराश झाला होता. आतां काकूंनीं आपणहून करुणेबद्दल विचारावें अशाबद्दल तो आतुरतेनें वाट पाहत होता. तो आपणहून हल्लीं काकूंची चौकशी करी. काकूंनी हे पूर्ण ओळखले होतें. त्या आतां तो विषय मुद्दाम टाळीत होत्या.

तो करुणेशींच बोलण्याचा प्रयत्न करी. पण करुणा दिवाकरशीं बोलण्याचें जाणूनबुजून टाळीत होती. बाहेर कुठे लग्न जमत नव्हतें, त्यामुळें दिवाकर जास्तच चिडला होता.

अखेर दिवाकरनें आपणहून काकूंजवळ लग्नाचा विषय काढला.

काकूंनीं कांहीं तरी अडथळा काढायचा म्हणून पत्रिकेची सबब सांगितली. तात्काळ दिवाकरनें आपली पत्रिका आणून काकूंजवळ दिली व मोठ्या मिनतवारीनें काकूंजवळून करुणेची पत्रिका हस्तगत करून घेतली.

—आणि दुसऱ्याच दिवसापासून दिवाकर आपल्या अनेक मित्रांना सांगत सुटला कीं "करुणेची पत्रिका इतकी बलवत्तर आहे, कीं तिचें ज्याच्याशीं लग्न होईल त्याची एकदम भरभराट होणार आहे. तेव्हां श्रीमंतांच्या अनेक मुली माझ्याशीं लग्न करण्याची याचना करीत असूनसुद्धां मी करुणेशींच लग्न करणार !"

—मध्यंतरींची एक गंमत सांगावयाची राहिली.

त्याला कुणी विचारावें, "कायरे, त्या ललिता देशपांडे तुझ्याशीं लग्न करणार होत्या ना ? त्याचें काय झालें ?"

दिवाकरनें गंभीर चेहरा करून सांगावें "तिच्याबद्दल मला भलतीच माहिती कळली आहे !"

कांहीं दिवसांनीं—

"बरं त्या कमु परांजपेचं काय झालं ?"

दिवाकरः—तिची अमक्याशीं सलगी आहे !

नंतर कांहीं दिवसांनीं—

"बरं त्या केतकरचं—?"

दिवाकरः—छेः रे! ती तर भलतीच वाह्यात!

एवंच काय, कीं जी दिवाकरशीं लग्न करण्यास तयार होईना ती वाह्यात ठरूं लागली. आणि याच्याशीं लग्न करायला तयार होईल तेवढीच पतिव्रता ठरण्याचा रंग दिसूं लागला. आणि अखेरशेवटीं तो मान करुणेलाच मिळाला.

करुणेचें आणि दिवाकरचें लग्न झालें.

करुणेचें नांव 'रजनी' असें ठेविलें गेलें.

* * *

—दिवाकर-रजनीचें पहिले कांहीं दिवस अत्यंत आनंदाचे गेले. पूर्वी एकमेकांचीं मनें दुखविलीं गेल्याचा मागमूसहि त्यांच्या वागणुकींत दिसत नव्हता. पण माणसाची सूडबुद्धि कशी आणि केव्हां जागृत होईल याचा कांहीं नियम सांगतां येतो का?

—अलीकडे अलीकडे दिवाकरनें रजनीशीं तुसडेपणानें वागण्याचें धोरण ठेवलें होतें. रजनी त्यामुळें गांगरल्यासारखी झाली होती. तिला आपली चूक काय होते आहे हेंच कळत नव्हतें. कारण तिच्या वागणुकींत कांहीं चुकतच नव्हतें.

—मध्यंतरींच्या काळांत काकूंनीं या जगाला रामराम ठोकला.

—आणि नंतर दिवाकरनें वागणुकीचा अवतार धारण केला!

—परंतु दिवाकरच्या म्हणण्याप्रमाणें करुणेची— रजनीची—पत्रिका खरेंच बलवत्तर ठरत चालली होती.

त्याला एका संस्थानिकाच्या मुलाची शिकवणी मिळाली. तीच त्याला पगाराच्या सवाईनें पैसे देऊं लागली.

दिवाकर बी. टी. झालाच होता. चालू सालीं त्यानें एका पुस्तकावर नोट्स लिहिल्या त्याहि चिकार खपूं लागल्या! दिवाकरचा हात पैशांत वाहूं लागला.

त्यामुळें तर त्याच्या मनाची अस्थिरता भयंकरच वाढली. त्याला रजनी घरांत अडगळीसारखी वाटूं लागली होती.

त्याला वाटे आपण आपलें लग्न चार-दोन वर्षें लांबविलें असतें आणि आपल्याला आजची परिस्थिति आली असती तर केवढ्या तरी श्रीमंताची मुलगी आपल्याला मिळाली असती—

आणि ती संधि रजनीशीं लग्न केल्यामुळें आपल्या हातची गेली येवढ्या-करितां दिवाकर तळमळत होता, आणि येवढ्याकरितांच तो रजनीला हिडीस-फिडीस करूं लागला होता.

—रजनी बिचारी आतां एकाकी झाली होती. तिला आपण कसें वागावें हेंच कळत नव्हतें. नवऱ्याला वैभव आलें याबद्दल तिनें दुःख मानायचें का?

—आणि दिवाकरनें रजनीला दुखविण्याचा तडाखाच उठविला होता.

—घरांत नव्या नव्या वस्तु यायला लागल्या होत्या.

—आज दिवाकरनें एक आरशाचें कपाट आणलें.

"किती छान आहे ऽ!" रजनी.

"चूप. हो बाजूला—" दिवाकर उद्गारला.

आणखी कांहीं दिवसांनीं दिवाकरनें घरांत एक कपडे ठेवावयाचें कपाट आणलें. "आतां कपडे कसे व्यवस्थित राहतील बाई." रजनी.

"तुला घरांत कांहीं उद्योग नाहीं काय?" दिवाकर.

असें दर आठ-पंधरा दिवसांनीं होऊं लागलें.

आणि अशाच एका प्रसंगापासून रजनीनें घरांत अबोला धरला होता, त्याला आज पंधरा दिवस झाले होते. त्यामुळें मात्र दिवाकर थोडासा कावरा-बावरा झाला होता. त्याला वाटलें, ही प्रतिकाराला सुरुवात आहे वाटते. दिवाकर मनांतून प्रतिकाराला भीतच होता. कारण मनांतून तो रजनीवर लुब्धच होता. पण माणसाला असंतोषाच्या चटणीशिवाय सुखी व्हायला मौज वाटत नाहीं. म्हणून दिवाकर रजनीवर असंतुष्ट होता. एरवी रजनी त्याला हवीच होती. श्रीमंताच्या मुलीशीं लग्न करण्याची त्याची इच्छा अपुरी राहिली होती—त्या असंतोषाची चटणी तो तोंडीं लावीत होता.

आतां रजनीनें अबोला सोडावा याकरितां दिवाकराचा एकसारखा प्रयत्न चालला होता. तो तिच्याशीं आतां जरा जास्त प्रमाणांतच मोकळ्या मनानें वागूं लागला होता.

पण मनुष्यस्वभावच मोठा चमत्कारिक असतो.

आतां रजनीनें आढेवेढे घ्यायला सुरुवात केली होती.

आतां प्रसंग साधून एखादा अणकुचीदार शब्दांचा दगड दिवाकरच्या अंगावर टाकायला ती संधि पाहत होती.

म्हणजे एकानें समजुतीला यावें तर दुसऱ्यानें गैरसमजाचें जाळें ताणून धरावें; त्यानें गैरसमज सोडून द्यावा तर दुसऱ्यानें हिडीस-फिडीस करायला लागावें. याच्यांतच जगाचें स्वास्थ्य टिकून राहतें का ?

दिवाकरनें जंगजंग पछाडलें तरी रजनी हसती-बोलती होईना.

दिवाकरच्या घरांतील सर्व वस्तु आतां नव्या झाल्या होत्या.

जुन्या वस्तु सर्व नाहींशा झाल्या होत्या.

एक दिवस दिवाकराच्या लक्षांत आलें, घरांत जुना असा आतां फक्त पलंगच राहिला आहे.

तो रजनीशीं मुद्दाम बोलण्याचा प्रयत्न करीत म्हणाला—

" रजनी—"

" काय ?—"

" तुझ्या पायगुणानें घराचे सर्व स्वरूप तर बदललें—हरएक जिन्नस घरांत नवीन आली. आतां एवढा पलंग बदलून कोरा आणला पाहिजे—"

रजनीला कांहीं तरी आठवलें.

सूड घेण्यासारखा एखादा शब्द तिला आठवला वाटतें.

स्वतःकडे दिवाकराचें लक्ष वेधून घेत ती मिष्किलपणें हसत म्हणाली,

" पण सर्वच जुन्या वस्तु कुठं बदलतां येतात ? "

दिवाकरानें तिच्या म्हणण्यांतला भावार्थ ओळखला होता. तो खजील झाला. त्यानें अज्ञानाचें पांघरूण घेत पुन्हा विचारलें, " आतां कोणती जुनी वस्तु घरांत राहिली आहे ? "

रागीट पण रडव्या डोळ्यानें दिवाकरकडे रोखून रजनी म्हणाली,

" मी ! "

दुखऱ्या जागेला धक्का लागतांच मनुष्य गांगरतो त्याप्रमाणें दिवाकरला झालें.

रजनीचीहि तीच अवस्था झाली होती.

पण आतां दोघेंहि दुःखी झाल्यामुळें दोघेंहि एकमेकांकडे बावचळून पाहत उभीं राहिलीं !

---

# एक क्रांतिकारक : : ७

वेळ संध्याकाळी आठ-साडेआठची होती. आम्ही संध्याकाळचे फिरून परत येत होतों. कोणत्या तरी दोन कवींपैकीं 'हा' चांगला का 'तो' चांगला असला कांहीं तरी आमचा वाद चालला होता. माझ्या मित्राला जो कवि चांगला वाटत होता तो मला भिकार वाटत होता. कारण त्याला कवि म्हणून लाभलेली प्रसिद्धि, त्याच्या ईश्वरदत्त गोड गळ्यामुळें मिळालेली होती, असें माझें प्रामाणिक मत होतें. माझ्या मित्रानें शंका काढली—"पण कवितेला अर्थ असल्याशिवाय कोणती कविता लोकप्रिय होईल?"

मीं म्हटलें—लोकप्रिय नटानें म्हटलेलीं कोणतीं पदें आपल्याला फारशी स्पष्ट ऐकायला येतात? मग अर्थ कळण्याची तर बातच दूर. पण तींच पदें आपल्या-वर मोहिनी घालतात ना?

—इतक्यात आमच्यामागून माणसें येत होती. त्यांच्या मोठमोठ्यानें चाललेल्या संभाषणानें आमचें संभाषण बंद पडलें.

"या सगळ्या बूझ्वी वाङ्मयाची होळी पेटविली पाहिजे. भांडवलवाल्यांची कत्तल झाली पाहिजे— !"

मी टकमक त्या माणसाकडे पाहतच राहिलों.

अंगांत एक खादीचा कोट—डोक्याला गांधी टोपी—साधारण उंच व सड-सडीत बांध्याचा—गोरापान, भव्य भालप्रदेश, अशी ती बडबडणारी मूर्ति होती. त्याच्याकडे पहात मी मिस्किलपणानें हसलों.

ते लोक पुढें निघून गेले.

* * *

एखाद्या विशिष्ट व्यक्तीनें जोंपर्यंत आपलें लक्ष वेधलेलें नसतें, तोंपर्यंत ती व्यक्ति कितीहि वेळां आपल्या शेजारून गेली तरी आपल्या लक्षांत राहत नाहीं. पण एकदां लक्ष वेधलें म्हणजे तीच व्यक्ति रोज रोज भेटल्यासारखें आपल्याला वाटतें. वास्तविक हजारों वेळीं आपण त्या व्यक्तीशेजारून गेलेलों असतों. पण नंतर मात्र वाटायला लागतें, कीं ही व्यक्ति अलीकडेच का आपल्याला नेमानें भेटायला-दिसायला लागली आहे ?

माझेंहि तसेंच झालें होतें. त्या दिवशीं संध्याकाळीं भेटलेली व्यक्ति मला अलीकडे सकाळ-संध्याकाळ भेटायला लागली होती. नेहमीं त्या व्यक्तीबरोबर कोणी तरी असेच; आणि 'चालतें व्याख्यान' असल्याप्रमाणें त्या व्यक्तीची साभिनय जाळपोळीची आणि कसल्या तरी क्रांतीची बडबड चाले !

—मला आश्चर्य वाटे. उंदरांमुळें प्लेगचा प्रसार होतो म्हणून आपण निरोगीसुद्धां उंदीर पिंजऱ्यांत पकडून मारतों; आणि साधारण सुरळीत चालू असलेल्या या समाजांतहि त्या व्यक्तीची बडबड रोज रोज ऐकायला त्याला माणसें कशीं मिळतात ?

—बरें भेटतात तर भेटतात; पण त्या व्यक्तीप्रमाणेंच इतरहि माणसें पिसाळत कशीं नाहींत ?

ऐकणारीं माणसें शांतपणानें ऐकून घेतात आणि हा विचारांचा भुईनळाच तेवढा कसा सारखा जळत असतो ?

किंवा दिवाळींतल्या तारेच्या फुलबाज्या कपड्यावर धरल्या तरी कपडे पेट घेत नाहींत याप्रमाणें त्याच्या विचारांची दारू पेट न घेणारी आहे ?

—ती व्यक्ति नजरेआड झाली, कीं माझ्या मनांत येणारे असले विचार थांबत व भेटली कीं पुन्हा चालू होत.

—एक दिवस आणखी एक योग आला. तें चालतें व्याख्यान समोरून येत होतें. त्याच्याबरोबर माझाच एक मित्र येतं होता. मी सहज आळसटलेला चाललों होतों. मला पाहतांच त्या व्यक्तीच्या तडाख्यांत सांपडलेल्या व्यक्तीनें मला नमस्कार केला.

—जणूं त्या व्याख्यानाच्या तडाख्यांतून सुटायला तो संधीच पाहत होता.

—मला नमस्कार करून माझ्या मित्रानें त्या क्रातिवादी मित्राचा निरोप

घेतला. पुन्हा केव्हां तरी भेटण्याचें मला वचन दिलें. पण ती क्रांतिवादी व्यक्तिहि निराश झालेली किंवा हिरमुसलेली दिसली नाहीं.

नळ बंद केला कीं जसा पाण्याचा मागमूस लगेच नाहींसा होतो त्याप्रमाणें ती व्यक्ति बंद केलेल्या नळासारख्या स्तब्धतेनें चालूं लागली.

मला वाटलें याला मानवी मनोविकार कांहींच नसावेत काय ?

—पण त्या क्रांतिवादी व्यक्तीला लगेच पांच पावलांवर कुणी तरी भेटले.

"बूर्झ्वा वाङ्मयाची होळी झाली पाहिजे. भांडवलवाल्यांची कत्तल झाली पाहिजे !"

पुन्हा त्याच्या विचारांचा नळ चालू झाला.

—मला हसायला यायला लागलें.

—त्याच्या तडाख्यांतून सुटलेला माझा मित्र मला म्हणाला—

"याला तूं ओळखतोस ?"

"नाहीं" मीं छद्मीपणानें हसत म्हटलें.

"मग ओळख करून देऊं तुझी ?"

"कां ? मी सुखी असलेला पाहवत नाहीं वाटतं तुला ?"

"नाहीं पण त्याचे विचार फार चांगले आहेत !"

"असतील ! पण माझ्याभोंवतीं विचारांची आग काय कमी आहे म्हणून भरतीला ही आग आणखी ओढवून घेऊं ? आणि तुला त्याचे विचार एवढे चांगले वाटत होते, तर त्याला असा डावलून माझ्याकडे कां आलास ?

"नाहीं, आतां मला खरंच काम होतं. आणि खरं सांगूं का तुला, तो इतका निष्पाप आहे, कीं व्यवहारी वृत्तीनं त्याच्याशीं सडेतोडपणानं वागणंहि अशक्य होऊन जातं—पण एरवीं मनुष्य फार चांगला—हाक मारूं का त्याला ?"

"आणि तूं तरी काय वाईट आहेस ? तुझ्याइतपत चांगला मनुष्य मला चालेल. फार चांगल्याची मला आवश्यकता नाहीं."

* * *

रस्त्यांतून कापड विकीत जाणाऱ्या चिन्या-जपान्यकडून त्यांच्या फाजील सलगीच्या वागण्यानें कापड घेण्याचें मी नेहमीं टाळतों त्याप्रमाणेंच त्या क्रांतिवादी माणसाला मी नेहमीं टाळीत असे. ते चिनी-जपानी कापडवाले जसे

नेहमींच गांवाला जाण्याच्या घाईच्या सबबीवर सतत कापड विक्रीत फिरत असतात—नेहमीं कापड विकूनहि त्यांच्या पाठीवरचा बोजा कधीं कमी झालेला दिसत नाहीं किंवा तेहि कधीं गांवाला गेलेले दिसत नाहींत. त्याप्रमाणें ती क्रांतिवादी व्यक्तीहि मला त्या चिनी-जपानी कापडविक्यांसारखीच वाटे! भेटेल तेथें गिऱ्हाईक गटविण्यांत जसे ते कापडविक्ये पटाईत, त्याप्रमाणें हा बिचारा क्रांतिवादीहि मला वाटे. रस्त्यांतून मी त्याला एकटा किंवा स्तब्ध असा जातांना कधींच पाहिला नव्हता!

* * *

—पण तो प्रसंग आज आला होता.

एका घरीं मी जेवायला गेलो होतो. पहिल्या भरपंक्ती जेवून गेल्या होत्या. मीहि जरा उशीराच गेलों होतों.

—तिथें तो क्रांतिवादीहि जेवायला आलेला होता. पण त्याचें जेवण होऊन तो दिवाणखान्यांत एकटाच पान खात बसला होता.

—पण बोलण्यांत जितका तो 'भरभर' होता तितका तो मला विडा खातांना शांत वाटला. अगदीं एखादा खानदानीचा माणूस जितक्या विलासानें व सोलीव अभिरुचीनें विडा खातो, तितका तो पान खाण्यांत रंगलेला, मला दिसला!

एक मांडी पालथी घालून त्याचें विड्याचें पान सोलणे चाललें होतें. पानाची बारीक शीरन् शीर तो सोलून काढीत होता.

मी विचार करूं लागलों. इतका सहनशीलपणा, आस्था व शांतता यानें आजच कोठून पैदा केली?

—का लग्नांतील भांडवलशाही जडान्नानें त्याला गाफील केलें?

—तो माझ्याकडेहि मधून मधून पाहत होता. पण मी असा गंभीर चेहरा करून बसलों होतों, की माझ्या सलगीचा माणूसहि त्या वेळीं माझ्याशीं बोलायला दबकला असता.

त्याचें पान खाऊन झालें व स्वतःशींच हसत तो मागच्या तक्क्याला आडवा झाला. सहज आळसटलेला हात त्यानें हालवला तों त्याच्या हाताशीं

एक मासिक लागलें. तें हातांत घेऊन तो चाळूं लागला व एका पानावर थबकला !

मी दिवाणखान्यांत शतपावली करूं लागलों व तिरकी नजर करून तो काय मजकूर वाचीत आहे तें टेहळूं लागलों.

—तो एका कवितेच्या सापळ्यांत सापडला होता.

—मला आश्चर्य वाटलें. मला वाटले क्रांतिकारकाचें आणि काव्याचें वांकडें असेल. पण तो तर चक्क कविताच वाचीत होता. नव्हे त्या कवितेंत रंगला होता.

—आणि मग मला कसलें तरी हसायला आलें. हे लोक विकारानें जरा पागलच असतात असें मीं ऐकलें होते. तेव्हां वाटलें, कीं ती कविता बहुधा ठराविक सांच्याचें प्रेमाचें तुणतुणें असेल !

कांहीं वेळानें त्यानें घड्याळाकडे पाहिलें आणि झटदिशीं कपडे करून तो निघून गेला.

—तो जातांच मी अधाशीपणाने तो मासिकाचा अंक हातीं घेतला आणि तो कोणती कविता वाचीत होता तें पाहूं लागलों. त्या अंकांत एकच कविता होती आणि ती वत्सलरसाची होती. कविता—खरेंच सुंदर होती. मीं झटकन अंक खालीं टाकला आणि खिडकींतून त्याला पाहूं लागलों पण मला तो जातांना पुसटपुसट दिसला.

—मीं पुन्हा स्वस्थपणानें ती कविता वाचली आणि मला वाटलें ती वत्सल-रसाची भावमधुर कविता वाचून त्याला आपल्या घरच्या चिल्यापिल्यांची आठवण झाली असावी–आणि म्हणूनच तो तांतडीनें उठून गेला असावा का ?

नंतर मला त्याचें नांव कळलें. त्याच्या घरची माहितीहि मला कळली. त्याला बायको होती. मुलें होतीं.

संध्याकाळ होतांच तो ओढीनें घरीं परततांना दिसे. तो घरीं यायच्या वेळेला त्याच्या घरींहि आतुरतेचें वातावरण दिसे !

—काय फरक होता त्याच्या-आमच्यांत ?

—तो कधीं कधीं संध्याकाळीं मंडईतहि दिसे. कधीं डाळिंब, कधीं कांहीं, असा चिमणचारा तो घरीं नेत असे.

—आणि आम्ही तरी काय करीत होतों. मग त्याच्या-आमच्यांत फरक कुठें आला. मग तो क्रांतीची भाषा कां बोलतो ?

—समजा त्याच्या मनाप्रमाणें क्रांतीची होळी पेटली तर त्याचें कुटुंब तरी त्यांतून सुटलें असतें का ?

क्रांतीची बडबड करणाऱ्या माणसांबद्दल माझा भलता गैरसमज आहे ! पण या क्रांतीवाद्यांबद्दल मात्र मला आपुलकी वाटायला लागली होती.

कारण तो गृहस्थ होता. एका कुटुंबाचा धनी होता ! आमच्या सुख-दुःखांच्या भावना त्याच त्याच्याहि होत्या.

—मग ही क्रांतीची बडबड कां ?

—पण मग मीं जरा माझ्या जीवनाकडे निरखून पाहिलें.

मी जरी क्रांतीची बडबड करीत नव्हतों तरी माझी कशाबद्दलहि कुरकूर नव्हती असें थोडेंच होतें ?

—मग माझी ती कसली तरी कुरकूर म्हणजे क्रांतीची केविलवाणी कुज-बुजच नव्हती का ?

—म्हणजे मग मी कुजबुजत होतों आणि तो किंचाळत होता येवढाच त्याच्या-माझ्यामधला फरक होता का ?

—कारण एकच ?

—फक्त स्वभावभेदामुळें आवाजाचा कमी-अधिकपणा ?

—नाहीं म्हटलें तरी एक फरक होता त्याच्या-माझ्यामध्यें. माझी कुरकूर फक्त माझ्या स्वतःपुरती होती— आणि त्याचें किंचाळणें— सगळ्या समाजाच्या नांवानें, देशाच्या—जगाच्या नांवानें होतें !

—साधें बोलून अर्थ व्यक्त करणें व अतिशयोक्तीनें तेंच ध्वनित करणें येवढाच फरक वाटला मला त्याच्या-माझ्यांत !

* * *

—लहानपणीं संध्याकाळच्या वेळीं गांवाच्या शिवेपलीकडच्या वडापिंपळा-खालून जातांना जशी भीति वाटते, तशी लोकांना या क्रांतिकारक म्हणविल्या जाणाऱ्या लोकांबद्दल वाटते.

—मोठेपणीं ही भीति नाहींशी होते खरी, पण मग त्या वडापिंपळाचा लहान मुलांना भीति दाखविण्याकडे आपण उपयोग करतों. मी दोन्ही तऱ्हेनेंहि

उपयोग करीत नव्हतों. पण कां कुणाला ठाऊक हे लोक मला उपक्षेणीय वाटत! अगोदर चालू समाजांतून आपल्या वागणुकीनें हे लोकच फुटून बाहेर पडतात आणि मग लांबून ते समाजाशीं बोलायला लागतात. त्यामुळें स्वतःबद्दल गैरसमजच वाढवून घेतात! आणि मग यांनीं समाजाला शिव्या द्यायच्या आणि समाजानें यांच्याशीं वाह्यातपणानें वागायचें!

—एखादा दिवा जास्त भरल्यामुळें फडफडतो तशी यांची स्थिति होते. नवविचाराचें तेल जास्त झाल्यामुळे हे डचमळून फडफडत असतात आणि हा फडफडणारा दिवा मालविण्याकरितां समाज लांबून फुंकर मारीत असतो!

वास्तविक समाजाला उजेड हवा असतो. यांना समाजाला मार्ग दाखवा वयाचा असतो. पण—

आतां मी त्याच्या घरीं जाऊ येऊं लागलों होतों. आम्ही रामनामाचा जप करतों त्याप्रमाणें लेनिन्, स्टॅलिन–ट्राट्स्की–या देवतांचा त्याचा जप चाले, पण त्यामुळें रशियांत मराठींत रामायण वाचलें तर जो परिणाम होईल तोच त्या जपाचा माझ्यावर होत होता.

वास्तविक किती प्रेमळ माणूस तो. भयंकर भावनाप्रधान. कोणत्याहि विषयावरून तो समाजवाद, भांडवलशाही या शब्दाकडे तडक धावत जाई. आणि याच अवखळपणामुळें त्याचें बोलणें लोकांचा करमणुकीचा विषय झाला होता. साध्या घरगुती अडचणींनासुद्धां त्याचें उत्तर समाजवाद, भांडवलशाही इथपर्यंत पोंहोचें!

—आणि हें सर्व त्याचें मनापासून चाले. त्यामुळें मला त्याची कींव येई! आणि वाटे, कांहीं कांहीं हिंदी चिजा ऐकून आपल्याला गायन ऐकल्याचें समाधान वाटतें; पण त्या चिजेंतील अर्थाची माधुरी आपल्याला उपभोगितां येत नाहीं. तसेंच कांहींसें त्याचें झालें होतें.

तो काय म्हणत होता हें त्याचें त्याला कळत होतें, पण लोकांना आपुलकीची भावना उत्पन्न करून त्याला तें सांगता येत नव्हतें. तो आपल्या-कडून जीव तोडून सांगण्याचा प्रयत्न करीत होता—पण न कळण्याच्या पद्धतीनेंच!

त्यामुळें हा भयंकर चिडे आणि लोक आपली करमणूक करून घेत!

—त्याची अडचण माझ्या लक्षांत आली होती. रशियन वाङ्मयवाचनांत सर्व वेळ गेल्यामुळें, हिंदुस्थानविषयक माहिती त्याला अजीबात नव्हती असें म्हणण्याइतकी थोडी होती—

आणि नुसतेंच तत्त्वज्ञान समाजाला आपुलकीचा विषय कधींहि वाटायचा नाहीं !

—आमच्या देशाबद्दल बोला ! आमच्या धर्माबद्दल बोला ! आमच्या-बद्दल बोला—आणि क्रांतीची भीषण बडबड करूं नका—क्रांतीचें सौन्दर्य समजावून सांगा. सौन्दर्याकरितां कोणीहि त्याग करायला तयार होईल—भीषणतेकरितां कोणीहि डोकें फिरवून घेणार नाही !

—आतां माझेंच पाहा ना—तो बोलत होता. तें समजावून घेण्यापेक्षां तो मनुष्य काय आहे हें पाहण्याचा मी प्रयत्न करतों आहे. आतां मी त्याच्या स्नेह्यांत सांपडलों आहें; पण त्याच्या विचाराकरितां नव्हे—त्याच्या व्यक्तीगत साधेपणाकरितां—निर्दोष आणि आकर्षक आयुष्याकरितां.

—आणि ती मोहिनी पडल्यामुळें— त्याच्या विचारांचा कानोसा घेण्याचा अलीकडे मी प्रयत्न करतों. आतां मला " बूर्झ्वा वाङ्मयाची होळी झाली पाहिजे—भांडवलशाही नष्ट झाली पाहिजे " या शब्दांची भीति वाटत नाहीं !

---

## मुंबईची सुंद्री : : १

आज आपला सहजच म्हणून मी 'विश्वोदय' मासिकाच्या कचेरींत गेलों होतों. विश्वोदय मासिकाच्या संपादकाची आणि माझी लहानपणापासूनची दोस्ती. मी माझ्या ऑफिसांतून सुटलों कीं केव्हां केव्हां 'विश्वोदय' मासिकाच्या कचेरींत जात असे. माझा लेखनाशीं कोणत्याहि तऱ्हेचा संबंध नसल्यामुळें व संपादक माझे लहानपणापासूनचे दोस्त असल्यामुळें संपादक-महाशय माझ्याशीं फारच मोकळ्या मनानें बोलत. तास अर्धातास आमच्या गप्पा चालत व मग तिथेंच सोडा लिंबू अगर चहा काहीं तरी घेऊन आम्ही दोघेहि बाहेर पडत असूं.

या नेहमींच्या सवयीप्रमाणेंच मीं आजही आलों होतों.

बऱ्याच गप्पा वगैरे झाल्यानंतर संपादकमहाशयांनी विचारलें, "आज काय सोडा का चहा मागवायचा?"

मीं म्हणालों "चहाच मागवा आज!"

टेबलावरची घंटा वाजवीत—पण ती मोडली आहे असें कळल्यामुळें संपादकांनीं हाक मारली, "अरे हरी—चहा सांग पाहूं एक दोन कप—"

मी हळूच विचारलें "हा हरी कोण?—आपला विठू मोहिते कुठं गेला?"

संपादक केवढ्या मोठ्यांदा तरी हसले. मला त्यांच्या हसण्याचें कारण कळेना. टेबलावरचा एक कागद चुरगळीत मीं हळूच म्हटलें, "कां, असा चेकाळला आहेस कशानं?"

टेबलावरचे पेपरवेट टेबलावर भोंवऱ्यासारखें फिरवीत संपादक म्हणाले, "विठू मोहिते—विठू मोहिते—तो गेला लेकाचा पळून! आज चारसहा दिवस झाले."

मीं आश्चर्यानें विचारलें, "काय पळून–कांहीं चोरी वगैरे? अरे तो तर चांगला दिसत होता स्वभावानें. मग त्याला मधेंच ही काय अवदसा आठवली? अन् हो, मला वाटतं मीं त्याला काल संध्याकाळींच ओझरता पाहिला—"

"खरंच—मग असं कर. पुन्हा तुला तो दिसला कुठं तर मुद्दाम घेऊन ये त्याला इकडे. मूर्ख लेकाचा! तो कसला अजागळ चोरी करणार—"

"मग केलंन् तरी काय त्यानं?"

संपादक पुन्हा एकदां खूप आडवे तिडवे हसले. इतक्यांत सांगितलेला चहा आला. "चहा घ्या अगोदर मग सांगतों गंमत—"

मीं मुकाट्यानें चहा घेतला. संपादकांना चहा पितांना पुन्हा हसण्याची उबळ आली. त्यामुळें त्यांच्या सदऱ्यावरहि थोडासा चहा सांडला. अखेर पांचदहा मिनिटांनीं ते शांत झाले आणि म्हणाले, "विठू मोहिते–अरे गंमत काय झाली, आज जवळ जवळ महिना दीड महिना– विठू मोहित्याच्या वागणुकींत मला थोडीशी चलबिचल दिसली. एरवीं मीं घंटा वाजविली कीं तो पटकन् यायचा; पण आज महिना दीड महिना–दोन दोनदां घंटा वाजवावी, चारदोन हांका माराव्यात तेव्हां कुठें 'ओ' देई. आज बरींच वर्षें तो आमच्याकडे असल्यानं मींहि तितकं मनावर घेतलं नाहीं. एक दिवस मला कांहीं तरी शंका आली म्हणून मी त्याला हाक न मारतांच तो बाहेर काय करतो आहे तें हळूच पाहिलं तर तो लेकाचा एका मासिकांत मान घालून वाचीत बसलेला दिसला. मीं हळूच जाऊन त्याच्या पाठीवर थाप टाकली आणि थट्टेनं विचारलं 'काय संपादक, चहा सांगूं का एक कप–' तो भयंकर लाजला. केविलवाणं हसला आणि कशी तरी एकदां माझ्याकडे वर मान करून पाहून तो तिथून पळालाच. पुन्हा दोनचार दिवस तसेच गेले. तो पुन्हा हाकेबरोबर यायला लागला होता. चारआठ दिवसांनीं पुन्हा त्याची अळंटळं सुरू झाली. मला वाटलं कीं, तो मासिकांतलं भविष्य, वर्तमानपत्रांतील 'आंकडे' पाहत असावा. ही कल्पना येतांच मला चीडच आली आणि त्याची पक्की खात्री करून घेण्याचं मीं ठरविलं. सातआठ दिवसांपूर्वींची गोष्ट. दुपारच्या चहाच्या वेळीं मी हळूच उठून अगोदर पाहिलं. तो एका मासिकाचे अंकांत मान खुपसून बसला होता. मी परत येऊन खुर्चीवर बसलें आणि मोठ्यांदा हाक मारली तसा तो धांवत

धावतच आला. मी रागानंच म्हटलं, "चहा सांग लवकर." तो पळतच चहा सांगायला गेला, तसा मी त्याच्या बसण्याच्या जागीं गेलों. एका रिकाम्या खोक्याचं त्यानं टेबल बनविलं होतं; आणि त्यावर कांहीं मासिकं होतीं. दोन-चार दिवस हरवलेली माझी तांबडी-निळी पेन्सिल मला त्या मासिकांत सांपडली. त्या मासिकांत मला एक कागद सापडला. त्यांवर त्यानं कांहीं तरी लिहायला सुरुवात केली होती. मीं तो मजकूर वाचला व माझी हसतां हसतां पुरेवाट झाली. मीं तो कागद घेऊन माझ्या टेबलावर ठेवला. विठू परत आला पण त्याला तो कागद कांहीं अर्थात् सापडला नाहीं. अन् त्या दिवशीं आमच्या ऑफिसांत खूपच माणसं आलीं. तेव्हां मला कांहीं त्या दिवशीं त्याला बोलायलाच झालं नाहीं. त्या दिवशीं त्या आलेल्या माणसांबरोबरच मी बाहेर पडलों. दुसऱ्या दिवसापासून विठू कामावर आलाच नाहीं. थांब हं तो कागद दाखवतों तुला !"

येवढं व्याख्यान दिल्यावर संपादकांनीं तो कागद माझ्या हातांत दिला.

कागदावरील मजकूर खालीलप्रमाणें होताः—

**ममईची सुंद्री**

(लघुकळा)

**लेखकः—विठ्ठलराव सखाराम मोहिते.**

**"संगीत व्हिक्टुरिया टेशन" या नाटकाचे करते.**

सुंद्री जवा ममईला आली तवा अक्षी लई साधी व्हती. पन ममईचं पानी तिला तवाच लागलं. अलीकडं सुंद्री लइ लईच नटायची. लई म्हंजी काय लईच ! तिचा तो आंबाडा, ते

क्रिमजी रंगाचं पातळ, ती साळत जात नव्हती पर खाकंत बुक घेऊनच रस्त्यांतून हिंडायची.

म्यां जवा तिला बघितली तवा मी तिच्यावर लईच भाळून गेलों. अक्षी माझं पिरेमच बसलं ना तिच्यावर. तवापासनं मी तिला टेहळायला लागलों. पर तिच्यासंग बोलायला धीरच व्हइना मला.

मला वाटं जर मी त्या सुंद्रीशी बोलायला गेलों अन् ती जर रागांत किंचाळली तर तिचा बाप तो धोंडू सरवटे माझ्या पाठीची धिरडीच करायचा—

सूर्ये महाराज पाण्यांत बुडाले व्हते. चंदर महाराज " मी येऊ का ? मी येऊ का ? " अशा परमाणे बिचकत वर येत होते. सिमिंद्राशेजारीं वाळू व्हती. वाळू सरताच रस्ता लागत व्हता. रस्त्यावरून माणसं चालत व्हती. त्या रस्त्याला लागूनच माझं घर व्हतं—माझ्या घरासमोरच सुंद्री रहात होती. मी मनांत म्हटलं—

तिच्या माझ्या घरामधला जर येवढा रस्ता धिरणीकंपानं गडप झाला—तर मग ती सुंद्री काय दूर हाय मला ?

* * *

—लघुकथा-लेखक येवढीच लघुकथा लिहून पळून गेल्यामुळें पुढें ती अर्धवटच राहिली होती.

मी विचारलें, " कायरे, मग येवढ्याच कारणाकरितां विठू मोहिते पळून गेला ! केवळ लघुकथा लिहिल्यामुळें ? याच्यांत पळून जाण्यासारखं काय आहे बुवा ? "

संपादक विठू मोहित्याच्या मनाचें विश्लेषण करीत म्हणाले, " अरे असं बघ. आपल्या सुशिक्षितांचीं मनं जितकीं निढावलेलीं असतात तितकीं कांहीं

कांहीं बाबतींत या अशिक्षितांचीं नसतात! ते कांही कांही बाबतींत मित्रे असतात. विठू मोहित्यानं लघुकथा लिहिलेली मला कळली यामुळें तो कां भ्याला माहीत आहे तुला? तो अजूनपर्यंत समजतो आहे, कीं 'लिवनं-पुसनं' करणं हें फक्त सुशिक्षितांचंच काम आहे— तें आपण करूं लागलों हा आपला गुन्हा झाला आहे.

मीं विचारलें "काय गुन्हा? हा रे कसला बाबा गुन्हा?"

संपादक म्हणाले, "हा त्याला विनयभंग वाटला असावा! कुलीन स्त्रीच्या वाटेला जाऊन तिची चेष्टा करावी त्याप्रमाणं आपण लघुकथा लिहिण्यानं लेखनकलेचा विनयभंग केला आहे असं वाटलं असेल त्याला?—"

मीं चेष्टेनें विचारलें, "मग हा काय वाङ्मयांतला पहिलाच विनयभंग आहे असं वाटलं कीं काय त्याला—?"

संपादक म्हणाले, "कदाचित् तो अलीकडे वाङ्मय वाचीत नसावा! पण मीं मात्र ठरवलं आहे, कीं त्याची 'ममईची सुंद्री' अशीच अर्धवट— माझ्या खास अंकांत छापणार 'जानपद' वाङ्मयाचा नमुना म्हणून!

---

# सत्ययुगाला सुरुवात ! : : १०

आज किती तरी वर्षांनीं आमची दोघांची भेट झाली होती. आम्ही दोघेहि एकाच वर्षी वकिलीची परीक्षा पास झालों. पण पुण्यास माझी वकिली चालणें मला शक्य दिसेना म्हणून मी पुण्याबाहेर पाऊल काढलें. पण दिनकरनें– आतां कसलें दिनकरनें– अबासाहेबांनी पुण्यासच पाटी लाविली. माझी पुण्याबाहेर वकिली जेमतेम चालली होती; पण अबासाहेबांनी पुण्यांत खूपच नांवलौकिक कमावला होता.

अबासाहेबांनीं पुण्यांत सत्तेचें घर बांधलें होतें. हाताखालीं गडी, नोकर, कारकून वगैरे सुद्धा प्रपंच त्यांनीं वाढविला होता. शिवाय ते सार्वजनिक पुढारीहि झाले होते. आम्ही आमच्या गांवीं अबासाहेबांचा वर्तमानपत्रांतून खूप लौकिक ऐकत असूं. आज प्रत्यक्ष पुण्याला येऊन त्याचें प्रत्यंतर पाहत होतों. आपल्याला खूप आनंद वाटला आणि अबासाहेबांनीं ज्या आस्थेवाईक-पणानें माझा आदरसत्कार केला तो पाहून तर, अबासाहेबांविषयीं माझा खूपच आदर वाढला.

गरीब विद्यार्थ्यांनाहि ते सढळ हातानें मदत करीत. एक दोन विद्यार्थि तर त्यांनीं घरींच संभाळले होते.

अबासाहेबांचा तो सुखी आणि त्यागी जीवनक्रम पाहून माझ्या मनाला परमावधीचें समाधान वाटलें.

मला वाटलें, मी जुन्या ओळखीचा म्हणून अबासाहेब माझ्याशी इतके आस्थेवाईकपणानें वागत आहेत; पण एक दोन दिवसांत मला आढळून

आलें, कीं लहानांपासून थोरांपर्यंत – गड्यांपासून श्रीमंतांपर्यंत अबासाहेबांची वागणूक एकाच थाटाची आस्थेवाईक होती.

कित्येक संस्थांना– खाजगी कुटुंबांना – त्यांची सढळ हाताची मदत होती.

—असें ते फुलासारखें आयुष्य पाहून – फूल जसें कुणालाहि वास देतें त्याप्रमाणें – मनाला किती आनंद झाला !

* * *

" या वर्षी आम्हीं घरींच मोठा गणपति बसवायचं ठरवलं आहे. अगदीं सार्वजनिक गणपतीप्रमाणें – या वर्षीच हा बंगला बांधला आहे. – अनायासं मोठं अंगणहि आहे बाहेर – तेवढाच दहा दिवस उत्सव – सर्व मेळे घरींच बोलवायला सांपडतील. तेव्हां पन्नास-पाऊणशेंपर्यंत एक उत्सवमूर्ति करून घ्यावी म्हणतों – राहणार ना गणपति होऊन जाईपर्यंत ? चला आपण जाऊं मूर्ति सांगायला- - "

" छेः ! गणपति होईपर्यंत कसें राहणे होणार मला ? अबासाहेब, आपल्या-इतका जरी माझ्या घरचा व्याप नसला, तरी—" मी.

" अरे हो, माहीत आहे—" आबासाहेब म्हणाले.

इतक्यांत पांडू सनईवाला आला.

" काय रे, या वर्षी गणपति बसवायचा आहे आपल्या घरीं मोठा मांडव घालून. गणरायांना आणायला–येशील का नाहीं तुझी वाजंत्री घेऊन ? "

पांडू हसत म्हणाला, " नाहीं म्हणून कसं चालेल धनी ? पर आपल्या तारखेचं काय झालं ? "

" काय व्हायचं – पुढच्या तारखेला हुकूमनामा मिळेल आपल्याला ! "

* * *

—आम्ही गणरायाची मूर्ति सांगण्याकरितां बाहेर पडलों होतों.

—पहिल्यांदा आम्ही आलों होनपांकडे. त्यांच्या मूर्ति म्हणे फार नामांकित असत.

आम्ही होनपांकडे जातांच होनपांनीं आमचें खूपच आगतस्वागत केलें. आमच्या जाण्याने त्यांना खूपच आनंद झालेला दिसला. आमच्या येण्याचें कारण विचारण्याच्या अगोदर त्यांनीं घरांत चहा करायला सांगितला.

" हें पाहा होनप, या वर्षी आम्ही घरींच गणपति बसविणार आहोंत, तेव्हां पन्नास-पाऊणशें रुपयांपर्यंत एक उत्सवमूर्ति तुम्हांला करायला सांगयला आलों आहोंत ! "

" वा-वा, आनंद आहे ! पण खरं सांगूं अबासाहेब, मनासारखी मूर्ति पाहिजे असेल तर त्याला दाडेकरांचाच हात हवा. माझ्या मूर्तीची वाखाणणी आपण ऐकत असाल– पण खरं सांगायचं तर माझ्या मूर्तींचा नांवलौकिक फक्त भडक रंगावर टिकून आहे– पण खरं कसब दांडेकराच्या हातांत ! मन-पसंत काम--वा-वा, गणपतीच्या मूर्ति कराव्यात तर दांडेकरांनींच. अशी प्रसन्न मूर्ति असते म्हणता त्यांची – ध्यान पाहतांच अगदीं तंद्री लागते !--"

" असं म्हणतां ? आम्हांला काय तुमच्या धंद्यांतली दृष्टि असणार ? लोकांत तुमचा नांवलौकिक ऐकला म्हणून आम्ही तुमच्याकडे आलों. मग एकंदरींत दांडेकर तुम्हांला भारी आहेत म्हणतां ? "

" हें पाहा, आपल्याजवळ हें कबूल करायला काय लाज आहे ? आम्ही म्हणजे आमच्या धंद्यांतले नाटकी गवई–खऱ्या बैठकीला का आम्ही चालणार आहोंत ? अहो, आमचे नुसते रंगढंग पाहून घ्यावेत—"

"-- पण प्रामाणिकपणानें हें कबूल करणारेहि फार थोडे असतात." मीं मध्येंच म्हटलें.

अबासाहेब उठूं लागले.

" चहा सांगितला आहे ना-- "

* * *

दांडेकर एक सुंदर मूर्ति रंगवीत बसले होते.

आम्हांला पाहताच त्यांनी आपलें काम सोडलें व त्यांनींहि आमचें होनपांच्यापेक्षांहि जास्त आस्थेवाईकपणानें स्वागत केलें.

अबासाहेबांनीं आपल्या येण्याचें कारण सांगितलें.

" म्हणजे तुम्ही उत्सवमूर्ति कायमचीच करून ठेवणार म्हणतां ? हो-हो, तेंहि बरोबरच आहे. दरवर्षी कोण पन्नास-पाऊणशें खर्च करणार म्हणा; पण अबासाहेब, थोडं आधीं कळायला पाहिजे होतं. होनपांनीं सांगितलं तें अगदींच खोटं आहे असं मी म्हणत नाहीं; पण होनपांनीं माझ्या गुणाबरोबर

माझा दोष नाहीं सांगितला. मला कामाला फार वेळ लागतो; आणि दिवसाकांठीं एक तासावर मला बैठक मारता येत नाही—या अशा प्रकृतीमुळं—तेव्हां नाइलाज आहे. बरं हें पडतं ठराविक वेळचं काम. चार-दोन दिवस आगं-मागं होऊन कसं चालेल ? — हां ऽ हां— ते पवार आपल्याला ऐकून माहिती असतील. माझ्या हाताखालीच शिकलेला— अगदी माझ्या हाताची घडण उतरली आहे त्याच्या हातांत. अगदी एक कसब ! अहो कित्येक वेळेला माझी कामं तोच करतो; पण गिऱ्हाइकाला ओळखतां येत नाहीं. अहो, तसं पाहिलं तर गिऱ्हाइकाला कुठं इतकी बारीक दृष्टि असते ?"

"मग आपणच सांगा आतां पवारांना आमच्याकरतां एक मूर्ति करायला—"

"——वा, आनंदानं. पण खरं सांगूं अबासाहेब, त्याचं हें यश आम्हीं कां हिरावून घ्यावं.—— आपण त्याच्याकडे जाऊन आर्डर दिलीत तर त्याला अभिमान वाटेल— आणि तो जास्त उत्साहानं आपलं कसब खर्च करून मूर्ति घडवील. आतां यांत थोडा त्रास आहे आपल्याला— पण त्याला कौतुक वाटेल आपल्या जाण्यानं— अहो, आपल्याला यांत कांहीं वाटणार नाहीं; पण आम्हां कलावंतांना हीच समाधानाची जागा ! चार लोकांनीं बरं म्हटलं— आपल्या-सारख्यांची घरीं पायधूळ झडली— नाही तरी हातीं असलेल्या कलेच्या मानानं कुठं पैसा मिळतो आहे या धंद्यांत आम्हा कलावंतांना ?"

* * *

आम्ही रस्त्यांत होतों.

"खरंच अबासाहेब, या दोन्हीहि कलावंतांचं मला खरंच कौतुक वाटतं. मला आज खरंच आनंद वाटला. एक कलावंत दुसऱ्याची इतक्या प्रांजळ-पणानं स्तुति करतो— आज आपल्याला चमत्कार वाटला—"

"अहो, आपण जगाला नांवं ठेवतों— पण सबंध जगाशीं आपला कुठं संबंध आलेला असतो ? म्हणून आपले अभिप्राय पुष्कळ वेळेला चुकतातच !" अबासाहेब म्हणाले.

——तोंच पवारांचें घर आलें.

——पवार दाराशींच उभे होते.

—आम्हांला पाहतांच त्यांना आश्चर्य वाटलें. आम्हांला घरांत घेत पवार म्हणाले, " काय दादा, आता कुठं मधेंच इलेक्शन काढलंत ? अन् काढलं असलंत तरी घरीं कशाला यायला हवं होतं.–आमचीं मतं केव्हांहि तुमचीच—"

अबासाहेब हसत म्हणाले, " आज जरा निराळ्याच कामाकरितां तुमच्या-कडे आलों आहे—"

अबासाहेबांनीं सर्व सांगितले तसतसा पवारांचा चेहरा सचिंत होत चालला. गांवांत आणखी एखादा यांच्यापेक्षांहि उच्च दर्जाचा कलावंत आहे की काय, याची मला धास्ती पडली.

—तोंच पवार म्हणाले, " अबासाहेब, राग नाहीं ना यायचा बोललों तर ? मूर्ति मी तर फक्कड करीनच. दांडेकर म्हणतात तें खरं आहे. त्यांच्याच पुण्याईनं आज पोटभर खातों आहे–पण देवा, आम्ही–'खातों-पितों.' आपल्या घरीं आमच्या हातची मूर्ति कशी चालेल ? आपण म्हणाल काय हरकत आहे. पण आपण नाहीं चालूं देणार. वाईट वाटलं माझं बोलणं–तर पायांतली पायतणं हाणा माला–त्यांत नाहीं वाईट वाटणार आपल्याला–पण आपल्यासारख्यांच्या इथं–हांऽहां–तो विठोबा सामंत–माझ्याच हाताखाली शिकलेला–कसब माझंच–अन् त्यांतून माळकरी. पंढरीची वारी चुकत नाहीं कधीं वर्षाची–हां-हां–तो असेलहि आतां घरीं–पलीकडच्या आळीलाच राहतो तो–चला जाऊंच या आपण त्याच्याकडे.

—अर्थात् आम्ही बाहेर पडलों.

* * *

आम्हांला सामंताचा दरवाजा दाखवून पवार परतले.

आम्ही सामंतांना हाक मारली.

सामंत ज्ञानेश्वरीची ओवी वाचीत बसले होते.

आम्ही जातांच 'पांडुरंग-पांडुरंग' म्हणत त्यांनीं ज्ञानेश्वरी मिटली. भक्ति-भावानें त्यांनीं 'आईला' नमस्कार केला.

सामंत ज्ञानेश्वरीला 'आई' म्हणत.

अबासाहेबांनीं येण्याचें कारण सांगितलें.

सामंत म्हणाले, " –**तेणें अमृताचिये ताटीं। जाण नरोटी ठेविली!** गांवांत होनपांसारखा मूर्तिकार असतांना–आम्हीं पामरांनीं हें काम हातीं घेणं–म्हणजे ज्ञानराय म्हणतात त्याप्रमाणें–**अमृताचिये ताटीं––। जाण नरोटी ठेविली!** कुठं होनपांचा अधिकार! देवा, आपलं काम त्यांनींच करावं! " पांडुरंग, पांडुरंग!" सामंत समाधिस्थ होण्याचा रंग दिसूं लागला.

––आणि मला रामराज्यांतील लहानपणीं वाचलेली गोष्ट आठवली. एकानें एका ब्राह्मणाला जमीन दान दिली. त्यांत मोहोरांचा हंडा सांपडला. ब्राह्मणं तो ठेवीना–जमिनीचा दाता तो आपला म्हणेना, अखेर तो मोहोरांचा हंडा––

––आमची पालखी परत होनपांच्या घरीं आली. " काय दिलीत दांडेकरांना आर्डर? योग्य-योग्य, मीं म्हटलं नाही तुम्हांला, तिथं तुमचं काम होईल म्हणून! केव्हा देतो म्हणाले? अहो तिथं काय यंत्र आहे नुसतं––"

होनपांचे बोलणारें यंत्र आम्हांला बंद करावें लागलें.

अबासाहेबांनीं, " कसंहि झालं तरी चालेल, पण आपणच काम पत्करा" असें सांगितलें. तसे होनप आळस देऊं लागले.

" बरं आहे. करतों तर मग–आपल्याला काय? पण अबासाहेब मग असं करा, आतां दिवस राहिले आहेत थोडे. तेव्हां या वर्षी उत्सवमूर्तीच्या भानगडींत नका पडूं आपण. अहो, ती एकदां केली, कीं कायम राहणार; आणि भरपूर सवड मिळाली तर मी तरी काय हार जातो कीं काय पवार-सामंत-दांडेकरांना– तेव्हां ही पाहा– ही मूर्ति पसंत करा आपण या वर्षी. आयती तयार आहे–अवघा सवा रुपया! पुढच्या वर्षी ऐशी ऐटदार मूर्ति बनवितों– माझं नांव राहून गेलं पाहिजे––तुमच्या इथं!"

*   *   *

संध्याकाळी अबासाहेब कांहीं सार्वजनिक कामांत गुंतल्यामुळें मी एकटाच बाहेर फिरायला गेलों होतों. लकडीपूल ओलांडून थोडा पुढें गेलों आणि लगेच परत वळलों. पुलाखालीं असलेल्या थोड्याशा हिरवळीवर चार लोक एकमेकांशीं मोठ्यांदा बोलत बसले होते. माझें सहज तिकडे लक्ष गेलें. मी ऐकूं लागलों,

" कां हो, होनप—चागलं पन्नास-पाऊणशें रुपयांचं काम आणि माझ्याकडे धाडलंत ? "

" माणसाच्या मनांत चांगले विचार कधींच येत नाहीत वाटतं ? "

" वा-वा ! खूप चांगला विचार केलांत ! "

" आणि महाराजा, आपण तरी काय चांगुलपणा दाखविलांत ? आपण माझ्यावर ती धाड ढकललीत. पण मी 'खातो-पितों'चं निमित्त पुढं करून विठोबा सामंताकडे—" पवार म्हणाले.

" **आधीं प्रपंच करावा नेटका। मग धरावें परमार्थविवेका** दासांनींच सांगितलें आहे ! " सामंत म्हणाले.

" मग पन्नास-पाऊणशें रुपयांची ऑर्डर नाकारण्यांत आपण प्रपंच तरी काय पाहिलांत साधुपुरुषा ? " दांडेकरांनी विचारले.

" रास्त आहे शंका. महाराज ! ही पन्नास-पाऊणशेंची ऑर्डर पुरवून पैसे कोण्या जन्मीं वसूल व्हायचे महाराजा ? बरं संबंध आहे श्रेष्ठांशीं ! बोलतांहि यायचं नाहीं. कधीं भेटलेच तर—दीनवाणें हसायचं त्यांच्या चेहऱ्याकडे पाहून पैशाच्या आशेनं. तेहि परत हसतील, समजलो म्हणतील; पण आम्हांला कशी उमज पडायची महाराजा ? "

त्यावर होनप म्हणाले, " पण आमची जीभ रेटेना. पन्नास-पाऊणशेंची ठोकर बसण्यापेक्षां सवा रुपयाची शेरणी वांटली या समजानें सव्वा रुपयाच्या मूर्तीवर पाणी सोडलें त्यांच्या नांवानं ! "

दांडेकर म्हणाले, " अशी अडचण होते पाहा अशा माणसांच्या बाबतींत. गृहस्थ हाताचा सढळ आहे, मनाचा उदार आहे, देणग्या देतो, विद्यार्थि पोसतो, पण घर आहे तेंहि सुरुवातीलाच गहाण– उधारी सत्रा ठिकाणीं—संस्थेकरितां मदतीचे आंकडे घातले आहेत–त्यांतील पुष्कळशा रकमा उधारच; असले हे फुग्याचे ताबूत ! हें काय सार्वजनिक आयुष्य म्हणावं ? मला वाटतें अशा लोकांवरूनच–'**हलवायाच्या घरावर तुळशीपत्र**' ही म्हण पडली असावी ! "

विठोबा सामंत म्हणाले, " म्हणूनच दासांनीं म्हटलं आहे—**आधीं प्रपंच करावा नेटका**—"

दांडेकर म्हणाले, " म्हणूनच तर बाबा अशा लोकांच्या बाबतीत अडचण पडते. धंदेवाली बाई असली तर वेश्या म्हणून हेटाळणी करतां येते; पण एखादी गरती जर चोरून-- तसेंच या अशा लोकांचे हे दानधर्म म्हणजे असलेल्या परिस्थितीशीं व्यभिचारच नव्हेत का ? "

—मला तें ऐकवेना.

—खरंच का असं असेल ?

—हे मला माहीत नसल्यामुळेच सत्ययुगाला सुरुवात झाल्यासारखी एक-मेकांची स्तुति करून ते आबासाहेबाची गणपतीची ऑर्डर का नाकारीत होते हें माझ्या ध्यानीं आलें. आणि--

—आणि कांहींच नाहीं !

—येवढेंच !

# नामदार खेर मुख्य प्रधान कसे झाले ? : : ११

सहज दुपारीं पडलों होतो. दुपारची झोप टाळण्याकरितां कसले तरी वर्तमानपत्र वाचण्याचा प्रयत्न करीत होतो; तरी झोप त्या वर्तमानपत्रालाहि दाद न देतां आपला अंमल माझ्यावर बसवीत होती. मीहि अखेर कंटाळलों आणि वर्तमानपत्र हातांतून टाकून दिलें आणि झोपणार, तोंच--

"जोशीसाहेब–" म्हणून कोणी तरी हाक मारली.

आवाज ओळखीचा वाटेना, म्हणून कपाळाला आठ्या घालून जरा तऱ्हेवाईक तऱ्हेनेंच "कोण आहे ?" म्हणून पृच्छा करीत मी दार उघडलें.

"मी प्रोफेसर--"

पुढें त्यानें नांव कांहीं सांगितलें नाहीं. तो इसम मला अनोळखीच होता. भरपूर उंच– पायांत तंग विजार–पठाणी बूट– पारशी फॅशन कोट– इंग्लरछाप मिशा — डोळे काळेभोर– अशी ती एक प्रोफेसर म्हणविणारी व्यक्ती होती.

"या बसा !" मीं म्हटलें.

हातांतील चिरूट फेकून देत माझ्याकडे पाहत त्यानें डोक्यावरची टोपी हातांत काढून घेतली आणि अदबीनें मीं दाखविलेल्या खुर्चीवर तो बसला.

डोळ्यांवरची झोप घालविण्याकरितां मी चूळ भरून डोळ्यांला पाणी लावून आलों आणि खुषींत येण्याकरितां खिशांतील चारपांच विड्या काढून टेबलावर टाकल्या व त्यांतील एक मी ओढूं लागलों—

मला वाटलें टेबलावरच्या विड्यांकडे तो आशाळभूतपणानें पाहत आहे; म्हणून मीं सहज एक विडी त्याच्यापुढें केली. मला वाटलें हा चिरूट ओढणारा साहेब विडीला हात पुढें करणार नाहीं.

—पण त्यानें आनंदानें ती विडी घेतली व तोहि धूर काढूं लागला.

—मला कसलें तरी हसूं आलें.

" बरोबर आहे आपलं हसणं. चिरूट ओढणारा मी विडी कशी ओढणार असं आपल्याला वाटलं ना ? पण मी पदरखर्चं करून व्यसन कधींच करीत नाहीं. पण व्यसनाशिवाय संगत नाहीं— तेव्हां जिथं जशी विडी— सिगारेट-चिरूट मिळेल त्याप्रमाणे पत्करतो, पण व्यसन असं नाही." त्याने आपला निर्व्यसनी-पणाचा दिमाख दाखविला.

" आणि एखादा दारू पिणारा भेटला तर ?—" मीं शंका विचारली.

" हॅऽहॅऽहॅऽ ! ! !" उत्तरावांचूनच त्याने माझी शंका मारून टाकली.

दोघांच्याहि तोंडांतील विड्यांची थोटकें झालीं. अर्थात् ती फेकून दिलीं गेलीं; आणि दोघांनींहि पुन्हा दोन नवीन विड्या हातीं घेतल्या.

नवी विडी पेटवीत त्यानें माझ्या टेबलावरच्या फोटोकडे बोट करीत विचारले—

" आपल्या वडिलांचा हा फोटो ? का कुणा सत्पुरुषाचा ? "

मी खूष झालों व म्हटलें, " होय, माझ्या वडिलांचाच ! "

माझ्यावर आपले डोळे रोखीत प्रोफेसर म्हणाला, " मी कुणा तरी सत्पुरुषा-चाच आहे: असें समजलों ! वा:, छान ! हे वडील आपले—भाग्यवान् आहांत जोशीसाहेब ! केवळ आपल्या वडिलांची कृपा म्हणून आपलं छान चाललं आहे हं ! नाहीं तर आपल्याला गुप्त शत्रु फार असले पाहिजेत ! पण केवळ आपल्या वडिलांचं कृपाछत्र आपणांवर असल्यामुळें—"

" आपण प्रोफेसर ज्योतिषी वाटतं ? " मीं नवीन विडी शिलगावीत विचारलें.

आतां त्यानें मला न विचारतांच माझ्या टेबलावरची विडी उचलली व पेटवीत म्हटलें, " अरे, ज्योतिषी लोक पक्के लफंगे आणि भामटे ! एक दोन— तीन— अमक्या घरांत गुरु आणि तमक्या घरांत शनि—ऑल रॉटन् ! "

" नाहीं मीं आपलं सहज अजमासानं विचारलं. तुमच्या बोलण्यावरून माझा तसा समज झाला ! " मी शांतपणानें म्हटलें. हा प्राणी कोण आहे, माझ्याकडे कां आला आहे, मला कांहीं अंदाज लागेना, पण ती व्यक्ति इतकी रुबाबदार होती, कीं मी थोडासा भारला गेलोंच होतों.

" आपण कालचा त्रिकाळ नाहीं पाहिला ? "

मला त्याच्या प्रश्नाचा अंदाज लागेना. मीं म्हटलें " पाहिला— कां कालच्या त्रिकाळमधें विशेष काय होतं ?—एक लाख चिनी सैन्य—"

" मजकुराबद्दल नाहीं मी बोलत--जाहिराती पाहिल्यात का?"

" नाहीं, जाहिराती नाहीं कधीं फारशा मी वाचीत."

" म्हणूनच! नाहीं तर तुम्हीं मला ओळखलं असतंत!" तो एकदम गंभीर होत म्हणाला.

" म्हणजे—?"

" माझा फोटो आहे जाहिरातीमधें!"

" अस्सं—" मी कालचा त्रिकाळ चाळूं लागलो. त्यांत मला जाहिरात पाह्यला मिळाली.

## "प्रो. व्ही. डी. आचार्य

सर्व जगभर प्रवास करून आपल्या विद्येचा झेंडा लावीत आलेले काश्मीरचे प्रख्यात भूत-भविष्य सांगणारे एकमेव अधिकारी विद्वान्! हजारो राजे-महाराजे, मिलिओनर्स, बॅंकर्स यांच्या शिफारसपत्रांसह पुण्यास आले आहेत. आपल्या विद्येचा सर्वत्रांना फायदा मिळावा म्हणून आज तारखेपासून पांच तारखेपर्यंत ते स्वतः घरोघर हिंडणार आहेत.

**फीचे दर**

राजांकरितां--देतील ती.

संस्थानिकांकरिता—मिळेल ती.

मिलिओनर्स—समक्ष ठरवूं.

बॅंकर्स—चेक चालेल.

श्रीमंतांकरितां--एका प्रश्नाला पंचवीस रुपये. प्रश्न प्रेमाचा असल्यास पन्नास रुपये.

दरिद्र्यांकरितां--सबंध आयुष्य वाचण्याबद्दल फक्त दहा रुपये. कदाचित् समक्ष भेटींत खूप सवलत मिळेल.

मॅनेजर—

**प्रो. व्ही. डी. आचार्य, लिमिटेड,**

**१४३, कोणती तरी पेठ, पुणें.**

जाहिरातींत प्रो. मजकुरांचा फोटो होताच. ओळख पटली. पण मीं मुद्दामच गंभीर होत म्हटलें, “ पण प्रोफेसर, आपल्या विद्येचा फायदा मला घेतां येणार नाहीं.” त्याने एकदम आश्चर्यचकित होऊन विचारलें, “ कां ? ”

“ दरिद्र्यांकडून आपण दहा रुपये घेतां; मी तर आधींच खूप कर्जबाजारी आहे ! ”

मी शक्य तितका काळजीखोर चेहरा करीत निःश्वास टाकीत म्हटलें !

“ अस्सं, पण सवलत आहे ना आमच्याजवळ ! ” प्रोफेसर उदारपणानें म्हणाले,

“ पण सवलत तरी मागून मागून किती मागायची ? ”

“ अच्छा, पांच रुपये द्या– केवळ तुमच्याकरितां ! ”

“ कसं शक्य आहे ? ”

“ अच्छा, चार द्या ! ”

“ शक्य नाही—”

“ मग आपण काय देणार ? जोशीसाहेब, अजून असा कधीं धंदा केला नाहीं, पण केवळ विद्येचा प्रभाव दाखविण्याकरितां, आणि प्रसाराकरितां—” तो सार्वजनिक कार्यकर्ता एखाद्या त्यागी वीराच्या अभिनिवेशानें म्हणाला.

“ पण माझ्या नशिबांत नाहीं दिसत तो योग ! ”

“ ऑल राइट, दोन रुपये तरी—? ” आतां मीं नाहीं म्हटलें तर आपण उठून जाणार असा आविर्भाव करीत प्रोफेसर त्याग करूं लागले.

“ शक्य नाहीं–” मींहि दगडासारखा चेहरा केला.

“ दोन रुपये नाहीं ? ”

“ नाहीं ! ! ”

“ अच्छा, काय देणार तुम्ही ? ”

“ फार तर दोन आणे– पण ते सुद्धां फुकट गेले असं समजून ! ”

“ काय बोलतां जोशीसाहेब, विद्या केवढी आणि दोन आणे ? चेष्टा करतां आमची तुमच्या दाराशीं आलों म्हणून ! मग असं करा, फुकट पाहतों आणि दाखवतों विद्येचा प्रभाव ! ”

" आपली तयारी आहे ! " मीं टेबलाच्या पैशाच्या खणाला कुलूप लावीत म्हटलें.

" काय जोशीसाहेब ! दोन आणे ? वंडरफुल ! "

" येस-- वंडरफुल ! दोन आणे-- सबंध आयुष्य ! ! "

" जास्त कांही नाही ? "

" अं हं ! "

" बरं एक गोष्ट कबूल कराल तुम्ही ? "

" काय ? "

" बोलायचं नाही कुठं ! अहो विद्या केवढी आणि मोबदला काय ! पण मी आपल्या विद्येचा प्रभाव तुम्हांला दाखविल्याशिवाय जायचं नाहीं असं ठाम ठरवलं आहे ! "

" आफत आहे माझ्यावर ! "

" शोभत नाही जोशीसाहेब आपल्याला हें बोलणं ? " तो अजीजीनें म्हणाला.

" दोन आणे फार तर ! " मी पुन्हा म्हणालो.

" जोशीसाहेब--देवाची शपथ आहे तुम्हांला, तुम्ही हे कुठं बोललांत तर-- अहो, आजपर्यंत दहा रुपयांखालीं हात नाहीं कुणाचा हातांत धरला; पण आपला योगच कांही बलवत्तर असला पाहिजे !--पण दोन आण्यांत मी तुमचा हात पाहिला, असं जर कुठं कुणाला कळलं, तर अब्रू साफ जाईल आमची ! पुन्हा कांही प्रोफेसर म्हणवून घ्यायला नको ! अहो, आपल्या देशांत आश्रय नाहीं म्हणून तर सामवेद इराणांत गेला. आणि आपण इथं इराण्याच्या हॉटेलमध्यें चहा पीत बसलों ! विद्येला आश्रयदाता नाही ! काय करणार- आज सामवेद गेला, उद्या ऋग्वेद, परवां अथर्ववेद-"

या सर्व बोलण्याचा भावार्थ माझे दोन आणे जाणार एवढा मी निश्चित घेतला. नंतर त्यांनीं माझ्याकडे चमत्कारिक पाहायला सुरुवात केली- जणूं तो माझा फोटोच काढतो आहे अशा आविर्भावांत त्यानें आपल्या चेहऱ्याचा कॅमेरा माझ्यावर लावला होता.

" जोशीसाहेब-- "

मीं आतां त्याच्याशीं फक्त नजरेनेंच बोलण्याचें ठरविलें होतें.

एखादा नट गातांना जसे हावभाव करतो, तसे त्या प्रोफेसरनें कांहीं न गातांच हावभाव करायला सुरुवात केली होती. सबंध खोलीभर तो शतपावली करीत हिंडत होता.

आणि दोन आण्यांत आपल्याला किती गंमत पाहायला मिळणार आहे हें मी मनांतल्या मनांत मोजीत होतो.

त्याने माझ्याकडे एकदम क्रूरपणानें पाहायला सुरुवात केली.

" जोशीसाहेब--" पुन्हा आरोळी आली.

मी शांतच होतो.

" पीस ऑफ पेपर प्लीज– एक कागदाचा तुकडा--"

मी मुकाट्यानें कागद त्याच्यापुढें केला. तो हातांत घेत– एखादा बाण लागून एखादा पक्षी जसा कोलमडावा, त्याप्रमाणें खुर्चीवर बसण्यासाठीं तो धडपडला ! पण माझ्यावर रोखलेली आपली दृष्टि मात्र त्यानें चळूं दिली नव्हती. त्यानें आपल्या खिशांतील पेन्सिल काढली आणि एखादा अवखळ मुलगा जसा पाटीवर रेखोट्या ओढतो, त्याप्रमाणें त्यानें त्या कागदाची दशा केली व झटकन् एक कुंडलीची आकृति त्यानें कागदावर उमटविली !

आणि त्याने एकदम जमिनीकडे पाहायला सुरुवात केली.

जवळजवळ पांच मिनिटें अशी गेली, कीं तो प्रोफेसर बसूनच झोपतो आहे असें मला वाटलें. आणि नंतर एकदम एखाद्याच्या अंगांत यावें अशा तऱ्हेनें एकदम माझ्या अंगावर खेकसून तो म्हणाला, " जोशीसाहेब—होल लाइफ इन् टू ॲनाज !"

" दोन आण्यांत सबंध आयुष्य !" मी नुसताच हसलों !

त्यानें तो कुंडली उमटविलेला कागद पुन्हा एकदां सूक्ष्मपणाने निरखून पाहिला. माझा चेहरा पुन्हा एकदां निरखून पाहिला आणि कुंडलींतील बारा घरांपैकीं अकरा घरांत त्यानें मनाला येतील ते आंकडे मांडले आणि एक घर कोरेंच ठेवलें व माझ्या कपाळावर आपली नजर रोखून त्यानें मला हुकूम फर्माविला !

" प्लेस युवर टू आना कॉइन हियर!" कुंडलींतील त्या रिकाम्या घरावर आपलें बोट आपटीत तो म्हणाला, " हें तुमचें भाग्याचें घर आहे—यावर दोन आणे ठेवा—"

मी त्याचा कावा समजलों होतों. मीं शांतपणें म्हटलें, " सबंध भविष्य ऐकल्यावर पैसे ठेवीन—"

" जोशीसाहेब ऐसा कैसा होगा? दक्षिणा प्लेस करो—" तो आतां मराठी भाषा सोडून हिंदी भाषेकडे वळत चालला होता.

मीं घड्याळाकडे पाहिलें; तीनला पांच मिनिटें कमी होतीं. तीन वाजतां मला एक मनुष्य भेटायला येणार होता. मलाहि ही करमणूक आतां संपवायची होती.

मीं मुकाट्याने दोन आणे काढून त्या रिकाम्या घरावर ठेवले. त्या नाण्याला नमस्कार करून अत्यंत भाविकतेनें तें नाणें त्यानें खिशांत टाकलें व गुप्त कानगोष्ट करावी या पद्धतीनें तो बोलूं लागला.

" जोशीसाहब, हम कुछ बोला तो आपकु बुरा तो नही लगेगा? सत्य-सत्य गोष्टी आपणाला सांगितल्या तर आपणाला राग तर नाहीं येणार, जोशीसाहेब?"

मीं नुसता मानेनेंच नकार दर्शविला.

" आतांपर्यंतचं आपलं जीवन—जोशीसाहब, अत्यंत खडतर गया होगा, सच, कहता हूँ! आपण सर्वत्रांशीं नीट—पुण्यमार्गानं वागतां—पण सगळे लोक आपणाला पाण्यांत पाहतात, खरं आहे ना?"

सर्व मानवी जीवांची एवढी एकच एक तक्रार असते—मग मी तरी ती कशी नाकबूल करणार? पण एवढ्या एकाच वाक्यांत माझें अर्धें आयुष्य सांगून संपलें होतें हें माझ्या नंतर ध्यानांत आलें.

—आतां एकदम राणा भीमदेवी पद्धतीनें त्यानें आपलें पाकीट हातांत घेतलें, ढोपरावरची टोपी डोक्यावर घातली व दाराकडे नजर रोखीत तो म्हणाला,

"नाइन्थ जानेवारी! नोट करो. जोशीसाहेब टिपून घ्या. नाइन्थ जानेवारी!"

"नऊ जानेवारी?"

"येस् नाइन्थ जानेवारी!"

"टिपून नको घ्यायला, माझी स्मरणशक्ति फार दांडगी आहे! नाइन्थ जानेवारी!"

तो टाळ्या उकळणाऱ्या वक्त्याच्या सुरांत हाताच्या मुठी वळून माझें भविष्य आकाशांतून खेचून आणून माझ्या घरांत ओतीत आहे, अशा धार काढण्याच्या आविर्भावांत म्हणाला, "जोशीसाहेब, नाइन्थ जानेवारी इज द टर्निंग पॉइंट ऑफ् युवर लाइफ! समजा?"

एकवार, दोनवार, तीनवार!!

तो बाहेर जाण्याकरितां वळलाच.

जोशीसाहेब, अविश्वास करूं नका–नोट इट डाउन. नाइन्थ जानेवारी इज द टर्निंग पॉइंट ऑफ् युवर लाइफ!" अर्ध्या मिनिटांत तो उंबऱ्यावर जाऊन उभा राहिला आणि—

—एक पाय उंबऱ्यावर व एक बाहेर अशा थाटांत मुरडून माझ्याकडे मागें पाहत तो म्हणाला—

"डू यू नो बाळासाहेब खेर?—प्राइम मिनिस्टर?"

"येस्–वर्तमानपत्रांतून!"

"बिफोर थ्री इयर्स—"

त्यानें मला पुरतें समजावें म्हणून 'थ्री' म्हणतांना मला आपलीं तीन बोटेंहि उंचावून दाखविलीं.

"समजा, बिफोर थ्री इयर्स!!"

"हं—"

"हमने उसकू बोला, 'बाळासाहब, आफ्टर थ्री इयर्स, कॉंग्रेस मिनिस्ट्री घेणार आणि आपण मुख्य प्रधान होणार'!"

“ हंऽऽऽ! मी आश्चर्यकारकपणा दाखवीत म्हणालों.

“ हंऽऽऽ! तीन बरसके पीछे– हम ये बोला ते वखताला तो बामण, बाळासाहेब खेर; हशला—काय समजे? आमच्या बोलण्याला हशला!! हं! ते वखताला वो तुमारा बाळासाहेब हशला! आणि बोलला “ ऐसा नहीं होगा ” तो हम खात्रीसे बोला, ‘बाळासाहेब, ऐसा होनाही पडेगा, ऐसा होनाही पडेगा, ऐसा होनाही पडेगा’!! ”

—आणि हेंच शेवटचें वाक्य उच्चारून तो प्रोफेसर पळत पळत अदृश्य झाला!

---

# जागा भाड्यानें देणें आहे! : : १२

**दृष्ट** लागेल अशी नवी बांधलेली सुंदर इमारत. भोंवतीं ऐसपैस अंगण. छोटीशी टुमदार बाग. अगदीं मध्यवस्तींत—पण त्याच्यावर आज तीन वर्षें म्हणजे जागा बांधून झाल्या दिवसापासून मी पाटी पाहत होतों

| |
|---|
| **जागा भाड्यानें देणें आहे.** |
| **चौकशी आंत करावी.** |

त्या पाटीचें मला आज बरेच दिवस कुतूहल वाटत होतें. इतकी सुंदर जागा आणि अशी रिकामी कां पडावी? आणि त्या घराचें नांवच जणूं पडलें होतें. "जागा भाड्यानें देणें आहे!"

लोक आपल्या खुणाहि त्या पाटीवरूनच सांगत.

"तें 'भाड्यानें जागा देणें आहे'चें घर आहे ना त्याच्या शेजारीं." आणि ती खूणहि सर्वांना पटण्याइतकी ती पाटी गांवांत सर्वांच्या लक्षांत राहिली होती. लोकांना वाटे नवसाकरितां कोणी कोणी आपल्या देखण्या मुलांना 'दगडाई', 'धोंडाई' अशीं नांवें ठेवतात त्याचप्रमाणें त्या घराच्या मालकानें अशाच कांहीं कारणाकरितां आपल्या घराचें नांव ठेवलें असावे

"जागा भाड्यानें देणें आहे!"

त्या घराचा मालक—

* * *

सुमारें चार वर्षांपूर्वी अनंताचे वडील वारले. अनंताच्या वडिलांना स्थावर इस्टेटीचा फार शौक होता. त्यांना सरकारी नोकरी होती ती फिरतीची होती. कुठें चार वर्षें, कुठें सहा वर्षें असे त्यांचे नोकरीचे दिवस गेले होते. चारसहा वर्षांत त्यांच्याजवळ जी कांहीं पुंजी साठे त्याची ते त्याच गांवांत कांहीं तरी शेतीवाडी घेत आणि त्यांची शेतीवाडी घेऊन झाली, कीं चारसहा महिन्यांत हमखास त्यांची त्या गांवांतून बदली होत असे. अशा तऱ्हेनें अनंतरावांच्या वडिलांनीं पांचसहा गांवीं थोडी थोडी शेतीवाडी केली होती.

खुद्द अनंतरावांची स्वभाववृत्ति या नेहमींच्या फिरतीमुळें कांहीं चमत्कारिक झाली होती. हें गांव–तें गांव; आज इथें–उद्यां तिथें; असेंच त्यांचें त्यांच्या वडिलांबरोबर आयुष्य गेल्यामुळें त्यांना कोणत्याच गांवाबद्दल आपुलकी अशी वाटत नव्हती. अनंतरावांचे वडील पुण्यास येऊन वारले.

त्या वेळीं अनंतरावांचें लग्न झालेलें होते. त्यांस एक-दोन वर्षांची मुलगी होती व एक लग्नाची लहान बहीण होती. अनंतरावांचा स्वभाव अगदींच कुढा बनला होता. अनंतरावांना आई होती. ती बाई स्वभावानें प्रेमळ असे; पण तिला व्यवहारांत कांहींच कळत नव्हतें व ती व्यवहारांत फारसें लक्षहि घालीत नसे. तिची अशी इच्छा होती, कीं आपण पेन्शन घेतल्यानंतर पुण्यास मोटें घर बांधून सुखानें दिवस काढावेत; पण तसें कांहीं झालें नाहीं. ठिकठिकाणीं शेतीवाडींत पैसे गुंतविल्यामुळें रोख रक्कम अशी थोडीच अनंतरावांचे वडिलांनी पुण्यास बरोबर आणली होती.

आणि अनंतरावांचे वडील पेन्शन् घेऊन पुण्यास येऊन राहिल्यानंतर आणखी एक झालें. नेहमीं नोकरीची सवय झाल्यामुळें व आतां एकदम रिकामपण मिळाल्यामुळें त्यांची प्रकृति एकदम ढासळली व आज-उद्यां, आज-उद्यां करतां-करतां ते एक दिवस मरून गेले. आणि अनंताच्या आईला जें पुण्यास आल्यानंतर सुखी आयुष्य म्हणून काढायचें होतें– तें न जमतां निराळ्या तऱ्हेनेंच आयुष्य बिचारीला काढावें लागलें!

अनंता या सर्व प्रकारानें बावचळून गेला होता. वडिलांचा वर्ष दोन वर्षांचा आजारीपणा–वडील गेल्यामुळें आईच्या स्वभावांत आलेली विरक्ति– त्याला चार ठिकाणच्या शेतीवाडीचा अगोदरच कंटाळा आला होता!

अनंताला अद्याप नोकरीचाकरी कोठे लागली नव्हती. त्यानें ठरविलें ही पांच-सहा ठिकाणची शेतीवाडी विकून टाकायची व त्यांत. पुण्यांत एक टोलेजंग घर बांधून राहावयाचें.

थोडक्याच दिवसांत त्यानें आपली सर्व शेतीवाडी विकली. सुदैवानें त्याला घर बांधण्याकरितां पुण्यांत भरवस्तींत जागाहि चांगली मिळाली.

त्यानें स्वतःकरतां आठ खण जागा अलग बांधायची ठरविलें होतें; आणि बाकीची भाड्याकरितां. सुरुवातीला भाड्याकरितां—छोटे ब्लाक्स बांधण्याचें त्यानें ठरविलें होतें. पण नंतर त्याला काय वाटलें कुणास ठाऊक, त्यानें विचार केला, कीं अशी बिऱ्हाडकरूंची जा-ये आणि अनियमित भाडें-वसुलीचा त्रास सहन करण्यापेक्षां एकाच मोठ्या कुटुंबास उपयोगी पडेल असा बंगला बांधावा. सर्व तऱ्हेच्या सुखसोईनीं बंगला नटवावा. कोणीहि आपल्याला भाडेकरी मिळेल आणि आपलें सुखानें चालेल—

—कुणाला यत्किंचितहि खोड काढतां येणार नाहीं असा सुंदर बंगला बांधून तयार होत आला होता. महिन्याभरांत बंगला राहण्यास तयार होणार होता. आपल्या घरावर पाटी असावी असे पुष्कळ लोकांना वाटत असतें. पण काय पाटी लावावी हाच त्यांच्यापुढें प्रश्न असतो. अनंताच्याहि मनांत आपल्या घरावर पाटी लावण्याची इच्छा सुप्तावस्थेंत होतीच, तो अनायासें योग आला.

—त्यानें अत्यंत हुरूपाने सुबक अक्षरांत तयार करून आणलेली पाटी आपल्या नव्या घरावर लाविली.

| |
|---|
| **जागा भाड्यानें देणें आहे.**<br>**चौकशी आंत करावी.** |

अनंतानें स्वतःकरतां बांधलेली जागा तयार झाली होती व त्यांत तो राहायला येऊनहि दोनतीन महिने होऊन गेले होते.

पार्टी लावण्याच्या दुसऱ्या दिवसापासूनच त्याच्याकडे रहदारी सुरू झाली. अनंताला आपल्या तयार होणाऱ्या बंगल्याकडे पाहून खूप हुरूप वाटत होता, अभिमान दाटला होता. त्याचें मनोराज्यच त्याच्या डोळयांसमोर बंगाल्याच्या रूपानें मूर्तिमंत उभें राहिलें होतें. आणि तो कसल्या तरी गर्विष्ठ भावनेनें तरारला होता !

नवीन जागा तयार झाली, कीं मध्यम वर्गाची मोठी तारांबळ उडते. स्वतःचे बंगले बांधणें त्यांना कधींच शक्य नसते. तेव्हां थोडी कमी जागा पत्करून व एकदोन रुपये भाडें जास्त देऊन ते नवीन जागा मिळविण्याच्या खटपटींत असतात. अशा लोकांचीच रहदारी पहिल्यांदा अनंताच्या दाराशीं सुरू झाली !

"जागा भाड्यानें द्यायची आहे ना ?" पहिला भाडेकरू अनंताकडे आला होता.

त्याच्या पोषाकाकडे पाहून अनंतानें विचारलें, "पण आपल्याला भाडें परवडेल का ? सबंध बंगला आम्हांला एकदम भाड्यानें द्यायचा आहे !"

"आपल्याला जगणें परवडेल का ?" हा सुद्धां विचार प्रत्येक मध्यम स्थितींतला मनुष्य रोज करीत असतो किंवा त्याला करावा लागतो आणि तशा स्थितींत आपल्या परिस्थितीची जाणीव अशी दुसऱ्याकडून झाली म्हणजे तर तो जास्तच खजील होतो.

तो भाडेकरी कुरकुरत म्हणाला, "मग तसें पाटीवरच लिहून का नाहीं ठेवलेंत ? म्हणजे तुम्हांलाहि त्रास झाला नसता आणि मलाहि झाला नसता !"

त्याच दिवशीं दुसरा भाडेकरी आला. त्यानेंहि विचारलें,

"जागा भाड्याने द्यावयाची आहे ना ?"

अनंतानें थोड्या नरमाईनें म्हटलें, "आपल्याला भाडें परवडणार नाहीं. सबंध बंगला भाड्यानें द्यावयाचा आहे आमचा !"

त्या भाडेकऱ्यानें म्हटलें, "वा—छान ! अशीच मोठी जागा पाहिजे आहे आम्हांला ! आमचीं माणसेंहि खूप आहेत–शिवाय गडीमाणसें, कारकून वगैरे–"

अनंतानें जागा दाखविण्यास सुरुवात केली. तशी त्या भाडेकऱ्यानें "इथें आमचें ऑफिस राहील– हा आमचा खाजगी दिवाणखाना–ही बसायची जागा–ही अमक्याकरितां–ही तमक्याकरितां—" सबंध बंगला पाहून झाला. तशी त्या भाडेकऱ्यानें विचारलें, "बस्स येवढीच जागा ? ही तर आम्हांला अपुरी पडेल ! आणखी कमींत कमी चारपांच खोल्या पाहिजे होत्या आम्हांला !"

अनंतानें खजील होऊन उत्तर दिलें, "नाहीं, येवढीच जागा आहे आमची !"

तो भाडेकरू हसतमुखानें अनंताला नमस्कार करीत बाहेर पडला व तो आपल्या आपल्याशींच हसूं लागला. तो म्युनिसिपालिटींत तीस रुपये पगार मिळविणारा एक कारकून होता; आणि त्याच्या घरीं फक्त त्याची बायकोच होती. अनंतानें विचारलें, "जागा परवडेल का ?—" त्यानें रुबाबांत उत्तर दिलें "पुरणार नाहीं म्हणून !"

या दोन भाडेकऱ्यांवरून अनंतानें धडा घेतला, आणि त्यानें नवीन पाटी रंगवून आणून बाहेर लावली.

**सबंध बंगला भाड्यानें द्यावयाचा आहे.**

**भाडें रुपये शंभर.**

वास्तविक त्या जागेस साठ रुपयांवर भाडें सांगणें मूर्खपणाचें होतें. पण नवीन घर बांधलेला मालक कांहीं तरी निशेंतच असतो. त्याला वाटतें "येवढें भाडें यायला काय हरकत आहे ?"

आतां सबंध बंगल्यास भाडेकरी यायला लागले. पण शंभर रुपये भाडें देणारा हरीचा लाल अनंतास कोणी भेटेना. एकानें अनंताला सांगितलें "अहो, शंभर रुपये महिना जो भाडें देईल तो पुण्यास सत्तेचें घर बांधणार नाहीं का ?"

बंगला संपूर्ण तयार होऊन सहा महिने होऊन गेले होते. आठपंधरा दिवसांनीं अनंता पाटीवरची धूळ पुसून पाटी स्वच्छ करी. एखाद्या मुलीचें लग्न ठरण्याइतकेंच अनंताचा बंगला भाड्यानें जाणे दुष्कर झालें होतें.

अनंता सर्व पैसे बंगल्यांत व राहायच्या जागेंत घालून बसला होता. बंगला भाड्यानें न गेल्यामुळें अनंताची चालू खर्चाची तारांबळ होऊं लागली. त्यानें मन घट्ट करून कुठें तरी नोकरी धरली.

वर्ष झाले.

बंगल्यावर पाटी तशीच शाबूत होती—

**" जागा भाड्यानें देणें आहे "**

संध्याकाळीं जातांना रस्त्यावरची रहदारी कुजबुजे. " हा बंगला अजून रिकामा—काय सुंदर बंगला आहे."

कुणी म्हणतात या जागेची वास्तु चांगली नाहीं. भुताटकीची आहे जागा!

आणि खरेंच, पहिले पाहून गेलेले भाडेकरी गांवांत सहज सांगत—तो बंगला भुताटकीनें भारलेला आहे!

कारण त्यांचा तिथें अपमान झाला होता. त्या जागेंत राहायला जायच्या त्यांच्या वासना अतृप्त राहिल्या होत्या. त्यामुळेंच त्यांना भुताटकीची गोष्ट सुचली असावी!

अनंताच्या हेंहि कानांवर आलें होतें.

आतां त्यानें दर महिन्यास दहा रुपये भाडें कमी करण्याचा क्रम चालविला. आतां अनंता आपला बंगला साठ रुपये भाड्यानें द्यायला तयार होता.

पण त्या बंगल्याकडे आतां कुणीच लक्ष द्यायला तयार नव्हतें.

अनंता चिडला. त्यानें एक दिवस मोठ्या अक्षरांत दारावर पाटी लावली.

**" सबंध बंगला फक्त चाळीस रुपयांत ! "**

ती पाटी वाचून लोक म्हणूं लागले. " भुताटकीची गोष्ट खरीच बरं का? एरवीं इतका सुंदर बंगला कोण देणार चाळीस रुपयांत ? "

अखेर अनंतानें कंटाळून बंगला विकून टाकण्याचें ठरविलें. पण गांवांत भुताटकीची कंडी जोरांत पिकली होती. बंगला विकत घ्यायलाहि कोणी तयार होईना.

आणि आतां त्या बंगल्याशेजारचे लोक म्हणत, " अहो, भुताटकीची गोष्ट खोटी नव्हे हं—रात्रीं बाराचे पुढें बंगल्यांतून निरनिराळे आवाज ऐकायला येतात—आणि कोणी तरी कांहीं तरी ओरडत असतो ! दारें खिडक्या वाजत असतात. उघड-झाप ऐकायला येते रात्रीं-बेरात्रीं. दिवसा बंगला बंदच असतो ! "

बिचारा अनंता !

—अगदी टेकीला आला होता.

बंगला बांधून दोन वर्षें पुरीं झालीं होतीं.

अनंताला त्या बंगल्यांत जाऊन राहण्याचाहि धीर होत नव्हता ! तो आपला त्या आठ खणांतच राही.

अनंताची नोकरी चालू होती. त्या बंगल्याकडे पाहणेंहि त्याला दुःसह वाटत होतें. त्याच्या राहत्या जागेत त्यानें जी आपली बसायची म्हणून खोली केली होती, त्या खोलीची खिडकी उघडी टाकली, कीं तो बंगला त्याला दिसे !

अनंता नोकरी करून घरीं येई ! त्याचें सर्व मनोराज्य ढासळले होतें. 'बंगल्याचें पुढें काय करावें.' हा त्याला विचार पडला होता.

आणि अलीकडे काय व्हायला लागलें होतें—अनंता नोकरी करून घरीं येई. त्याचें जेवणखाण होई. तो रात्रीं लवकर झोपे. तो साडेअकरा-पावणेबाराचे सुमारास नेमका जागा होई. त्या वेळीं त्याच्या खोलीची खिडकी उघडीच असे. त्यांतून तो बंगला त्याला दिसे. त्याचें चित्त अस्थिर होई. तो तसाच चाचरत चाचरत उठे. हलक्या हातानें त्या बंगल्याच्या किल्ल्या हातांत घेई आणि चोरट्यानें घरांत प्रवेश करावा त्याप्रमाणें तो हळूच आपल्या रिकाम्या बंद असलेल्या सत्तेच्या बंगल्याची कड्या-कुलपें काढीत बंगल्यांत शिरे. सर्व बंगल्याभर सैरावैरा हिंडे—पहिल्यांदा पहिला मजला, नंतर दुसरा—नंतर तिसरा—

तिसऱ्यामजल्यावरच्या खिडक्या उघडून तो बाहेर लांबवर पाही. सर्व जग झोपलें आहे, गार वारा बंगल्यांत घुसून आपल्या अंगाला झोंबतो आहे–तो कावराबावरा होई. तो त्या वेळचा एकलकोंडेपणा त्याला अगदीं असह्य होई. त्याला गरगरूं लागे–त्याच्या मनांतल्या त्याच्या अतृप्त वासना खडबडून जाग्या होत– आणि तो स्वतःच कांहीं तरी वेडेवांकडे हातवारे करीत बडबडूं लागे

## "भाड्यानें देणें आहे"

"जाऽगा—भाऽड्यानें देणें आहेऽऽऽ!!" आणि मग त्यांतच त्याला समाधान वाटे! असा तो पंधरावीस मिनिटें तिथें बरळत राही. मग कांहीं तरी आवेगानें तो बंगल्याचीं खिडक्यादारें झरझर लावून घेई. खळखळ कड्या वाजत–धाडकन् दारें लागत! आजूबाजूच्या लोकांना ही त्याची ओरड व धडपड ऐकूं येई–आणि अनंताला अलीकडे ही रोजची सवयच लागली होती.

पण तें ऐकून शेजारच्या लोकांना मात्र वाटे कीं भूत ओरडत आहे व खडबड करीत आहे त्या बंगल्यांत.

पण वास्तविक बंगल्याचा मालकच आपल्या सत्तेच्या जागेंत अतृप्त वासनांच्या भरांत किंचाळत होता.

## "जागा भाड्यानें देणें आहे!"

---

## खोटी गोष्ट ! : : १३

त्यानें आजच बिऱ्हाड बदललें होतें.

तसें त्याला घरचें फारसें कुणीच नव्हतें. एक फक्त सख्खी बहीण होती. ती त्याच्यापेक्षां मोठी होती, आणि तिचें लग्न होऊन आपल्या चार पोरांबाळांसकट ती आपल्या घरीं सुखानें नांदत होती.

हा या वर्षींच एल्‌एल्. बी. झाला होता. बहिणीचा त्याला थोडासा आधार होता व शिकवण्या करून त्यानें आपला विद्याभ्यास संपविला होता.

हजारांत निराळी दिसेल अशी त्याची शरीरयष्टि होती. अंगाचा तांबूस गौरवर्ण कुणाचीहि नजर त्याच्याकडे वेधून घेत होती. त्याची भरदार छाती आणि पिळदार दंड पाहून हा एल्‌एल्. बी. झाला आहे हें कुणाला सागून खरें वाटलें नसतें. तो एखाद्या तालमींतला 'दादा' आहे हेंच सर्वांना पटलें असते. पण तसा तो नव्हता.

तसा तो एकमार्गी मुलगा होता. त्याला स्नेहीहि फार थोडे होते. ललित-वाङ्मयाबद्दल त्याला बिलकूल गोडी नव्हती—रिकामटेकड्या कलावंत म्हणव-णारांनीं विचाराविकारांचीं जळमटें शब्दांच्या पुंजक्यांत छापून काढलीं, कीं झालें ललितवाङ्मय असें तो स्वतः समजत होता.

वकिलाची पाटी आज त्यानें आपल्या दारावर लाविली होती; आणि धंद्याला जरा बरी जागा असावी म्हणूनच आज त्यानें आपलें बरेच दिवसांचें खपरेल सोडून नव्या घरांत बिऱ्हाड केलें होतें. अद्याप त्याच्या शिकवण्या चालूच होत्या. शिकवण्या शिकविणारा तो एक एल्‌एल्. बी. वकील झाला होता.

—ती एक श्रीमंताची मुलगी होती. तीहि अत्यंत देखणी आणि बांधेसूत. तिच्या अंगापिंडाकडे पाहून ती 'अलीकडची मुलगी' आहे असें कुणालाच म्हणतां आलें नसतें. दिवाळीच्या सुमारास घरांना रंगसफेती करून घरें नटवतात, त्यांच्यावर आकाशदिवे लावतात त्याप्रमाणें तिच्या देहाचें नव्हतें. तिच्या डोक्याच्या छपरावर पान-फूल-फळाचें आकाशदिवे कधींच दिसत नसत. चेहऱ्याला रंगसफेती कधींच होत नव्हती. तिचीं वस्त्रप्रावरणें एखाद्या राष्ट्राच्या निशाणासारखी भडक रंगाचीं नव्हतीं. अगदीं साधें काम होतें तें. युद्धाला तयार असणाऱ्या राष्ट्राप्रमाणें ती सुसज्ज आणि सायुध कधींच नसे. डोळ्यांचे विषारी बाण—मिस्किल व उगाचच हास्याचे खाचखळगे उभारून—रस्त्यानें जातांना उगाच मागे वळून—मागेंपुढें पाहून—मध्येंच एखाद्या कोपऱ्यावर मध्येंच धनुकलीसारखे उभें राहून—ती कधीच कोणाच्या नजरेंत भरली नव्हती. दारिद्य नटवावयाचें म्हणून हातांत एकच उरलेल्या पाटल्यांचे दोन तासांचे सुती बिलवर करून दोन्ही हात शोभवणाऱ्या अप-टु-डेटपणापेक्षां ठसठशीत गोठ-पाटल्या जशा भारदस्तपणानें नजरेंत भरतात त्याप्रमाणें तिच्या देहाचे बारीक बिलवर नव्हते. दहावीस तोळ्यांच्या खसखशीत गोठ-पाटल्या असाव्यात असा तिचा देह होता; आणि आश्चर्य वाटेल— असें असून ती एका श्रीमंताची एकुलती एक कन्या होती.

—तो एक पिढीजात श्रीमंत गृहस्थ होता. तो जसा धनानें श्रीमंत होता तसा मनानेंहि श्रीमंत होता. आज त्याच्या वयाला साठावें वर्ष लागलें होतें. पण त्याची देहयष्टि अजून अशी तुकतुकीत व रेखीव होती, कीं त्यानें लग्न करायचें म्हटलें असतें तर श्रीमंतीच्या जोरावर नव्हे—त्याच्या शरीरयष्टीवर भाळूनच पुन्हा लग्न झालें असतें. पण तशी त्याला कांहींच जरूर नव्हती. कारण त्याची बायको अद्याप जिवंत होती. आणि तसा तो नेमिष्ट म्हातारा होता—तो एक-धान्यावरच जगत होता.

—तो पिढीजात श्रीमंत होता तरी त्यानें आपल्याभोंवतीं विनाकारण ऐश्वर्याचा फापटपसारा माजविलेला नव्हता. जीवनास अवश्य अशा गोष्टींपलीकडे तो कधींच कलाविलासाच्या भानगडींत पडत नसे. त्याला एक मुलगा होता, तोहि असाच. त्यानें आपल्या मुलाच्या श्रीमंतीच्या कल्पना फारशा वाढूं दिल्या

नव्हत्या. तो म्हणे माणसाच्या विकासाला कांहीं तरी जागा हवी. मी श्रीमंत आहे--माझे वडील श्रीमंत होते. आतां श्रीमंती वाढणार वाढणार तरी किती- आणि किती वाढवायची ? ती श्रीमंती राखून वाढविण्यापेक्षां कांहीं तरी माझ्या मुलाला निराळें जीवनकार्य हवें ! माझ्या पोराला--माझ्या इस्टेटीचा फायदा न मिळतां त्याचें मन असें तयार व्हायला हवें, कीं एखादा स्वतंत्र धंदा करून स्वतःच्या मेहनतीचे चार पैसे मिळवायला त्याला लाज वाटूं नये ! वैभवाच्या अवाढव्य डोंगरावर वाढलेलें गवत जसें आपोआपच उंच ठरतें-- तशी माझ्या मुलाची उंची ठरतां कामा नये. माझ्या वैभवाच्या डोंगर-पायथ्याला त्याच्या जीवनाचें झाड जगून वाढायला हवें आणि त्याचीं फुलें माझ्या वैभवाच्या डोंगरावर पडायला हवींत ! डोंगरावर झाड वाढलें तर त्याचीं फळेंफुलें दऱ्या-खोऱ्यांतून पडतात-कुजतात-घाण होते; आणि असे वृक्ष जीवनाच्या घोळक्यांतून बाजूला पडतात ! डोंगरावर एकाकी वाढणाऱ्या झाडाचीं फळेंफुलें त्या झाडाच्या एकटेपणामुळें आलींगेलींच दगडधोंड्यांनीं नासून आणि खच्ची करून टाकतात ! माझ्या पोराला सामुदायिक जीवन जगतां आलें पाहिजे. श्रीमंताचा पोरगा म्हणून जगाच्या क्रिकेटच्या मॅचमध्यें लायकी नसतांना तो कप्तान म्हणून मिरवायला मला नको आहे !

--आणि त्याचा मुलगाहि तसाच होता.

--ती मुलगी त्याची मुलगी होती.

—आणि तो एल्एल्. बी. तरुण त्या श्रीमंताच्या घरीं बिऱ्हाडानें राहायला येऊन त्यानें तिथेंच आज आपल्या वकिलीची पाटी लावली होती.

—त्या तरुणाचें नांव होतें पांडुरंग.

—आणि त्या मुलीचें नांव होतें शकुंतला.

शकुंतलेच्या लग्नाच्या वाटाघाटी घरांत चाललेल्या होत्या. आय. सी. एस्. श्रीमंतांचे रिकामे मुलगे, भारी पगाराचे नोकरदार, अशीं नाना स्थळें शकुंतलेला सांगून येत होतीं. पण ती तिच्या वडिलांना अजीबात पसंत नव्हतीं. ते म्हणत माझ्या मुलीच्या आयुष्याचें झाड मला इतक्या उंचीवर नेऊन लावायचें नाहीं. तेंहि जमिनीवरच लावायचें आहे. वाढीला जागा पाहिजे. जगायला मेहनत करायला सवड पाहिजे तिच्या आयुष्यांत ! पिठाच्या गिरणींत धान्य ओतावें

असें तिचें आयुष्य भरडून निघायला नको आहे मला. लहान मुलाला जशी शिक्षणाची सुरुवात आपण 'श्रीगणेशा'पासूनच करतों त्याप्रमाणें वडिलार्जित संपत्तीच्या जोरावर मुलांचें हें आयुष्य काढून घेऊं नये कोणी! "श्री–ग–णे–शा–" अशीच जर प्रत्येकाला आपल्या आयुष्याला सुरुवात करतां आली– किंवा सुरुवात करायला लावली –तर आज रूक्ष वाटणारें कित्येकांचें जीवन किती तरी सुखी होईल, पिढीजात श्रीमंतीपुढें लायकी-शिवाय आपल्या मुलामुलींच्या आकांक्षा वाढवून ठेवूं नयेत कोणी!

—आणि म्हणून ते आपल्या मुलीला सांगून येणाऱ्या स्थळांवर नाखूष होते.

एकाच वाड्यांत आतां राहत असल्यामुळें शकुंतला आणि पांडुरंग यांची अलीकडे बरेच वेळ दृष्टादृष्ट होऊं लागली होती. शकुंतलेच्या मनावर त्याचा कांही एक परिणाम झाला नाहीं; पण पांडुरंगाच्या मनावर मात्र झाला. पण तो कविकल्पनेंत किंवा आयुष्य ही लॉटरी आहे–किंवा खळगा करून वर पाला-पाचोळा पसरून–हत्ती जसे फसवून पकडतात तशी आयुष्यांत फासेपारध करण्याचीहि कल्पना नव्हती त्याची. त्याला वाटलें मुलगी किती सुंदर आहे. हिला चांगलें स्थळ मिळायला हवें!

शकुंतलेच्या वडिलांच्या मनांत पांडुरंग भरला होता. त्याचें सात्त्विक आयुष्य आणि विलोभनीय शरीरयष्टि यांचा त्यांना मोह पडला होता. त्याच्या सांपत्तिक स्थितीची त्यांनीं चौकशीहि केली नाहीं.

आपल्याला न मिळणारी वस्तु म्हणून पांडुरंग शकुंतलेकडे पाहत होता; आणि तिच्या लग्नाची धामधूम ऐकून जमल्यास आपणहि एखादें स्थळ सुचवावें या दृष्टीनें तो आपल्या मित्रपरिवाराची पाहणी करीत होता.

—आणि इथें एक विमा-एजंट मधें आला.

शकुंतलेचा एक दूरचा नातलग तरुण, तसाच गंमतीदार आणि आयुष्या-कडे खेळीमेळीच्या दृष्टीनें पाहणारा होता. त्याची आणि पांडुरंगाची खूप जानपछान अलीकडे झाली होती. तो विमा-एजंट होता; पण फार धोरणी होता. ज्याच्या त्याच्या परिस्थितीप्रमाणें विमा हसतखेळत गळ्यांत

बांधण्यांत तो पटाईत होता. तो विमेदारांना आपल्या मिळणाऱ्या कमिशनमधलें कमिशन कधींच देत नसे. “ आमच्या कंपनीचे या वर्षाखेर ‘व्हॅल्युएशन’ व्हावयाचें आहे; तेव्हां या डिसेंबरअखेर आपण आपला विमा उतरल्यास आपणांस खूप फायदा मिळेल ! ” ही ठराविक थापहि तो अजीबात देत नसे. माणसांचे स्वभाव पारखण्यांत त्याचा हातखंडा होता. जो भिडस्तपणामुळें विमा उतरण्याचें कबूल करून पहिला हप्ता जेमतेम भरील व पुढें त्याची पॉलिसी परिस्थतीमुळें रद्द होईल अशा केसेस तो नेहमीं टाळीत असे. हातांत सर्जिकल केस सापडली म्हणून खरूज-गळवांचें सुद्धां ऑपरेशन करणारा तो हौशी डॉक्टर नव्हता. तरीहि पण तो विमा-एजंट होता.

शकुंतलेच्या वडिलांनीं त्या विमा-एजंटाला लग्नाबद्दल पांडुरंगाचें काय मत आहे तें विचारायला सांगितलें होतें. आणि हें लग्न जमणार हें त्याला पक्कें पटलेंहि होतें. आणि तसें लग्न ठरलें तर तें त्यालाहि पसंत होतें व म्हणूनच त्याची हल्लीं पांडुरंगाकडे फार ये-जा चालू होती.

एक दिवस त्यानें पांडुरंगाला विचारलें, “ पांडुरंगपंत, जमल्यास आपण लग्न करणारच आहांत लवकरच—तेव्हां पांच हजारांचा तरी विमा उतरून ठेवायला पाहिजे आपण ! अहो, सगळ्यांनाच कांहीं सांपत्तिक परिस्थिति नसते; आणि कालमान तर हें असें, तेव्हां तुम्ही पांच एक हजारांचा विमा ठेवा उतरून – ”

“ लग्नाकरितां विमा ?—आपण असें कुणाला फसवायला तयार नाहीं.”

“ यांत फसवणूक काय आहे. अहो, तुम्हांला कांहींहि व्यसन नाहीं. एखादें व्यसन आपल्याला लागलें तर तें आपण चालवतोच का नाहीं ? आणि शिवाय असें आपण बांधून घेतलेलें असलें, म्हणजे व्यसन लागावयाची शक्यताहि नष्ट होईल ! ”

—बोलून-चालून तो विमा-एजंट. तो एकदां चिकटल्यावर काय सुटतो थोडाच. अखेर एक दिवस पांडुरंगानें पांच हजारांचा विमा उतरला.

—शकुंतलेच्या वडिलांनीं आपली मुलगी पांडुरंगाला द्यावयाचें आपल्या मनाशीं निश्चित ठरविलें होतें.

मात्र अद्याप पांडुरंगाला याचा सुगावाहि नव्हता.

एक-दोन दिवसांत संधि साधून ते पांडुरंगाजवळ गोष्ट काढणार होते.

—तों मधेंच एक दिवस पांडुरंग शकुंतलेच्या वडिलांकडे गेला आणि म्हणाला, " आपल्या मुलीला एक स्थळ सांगणार आहें मी आज. माझाच एक स्नेही आहे – "

शकुंतलेच्या वडिलांनीं कांहींच उत्सुकता दाखविली नाहीं. ते त्या या अशा चमत्कारिक माणसाकडे नुसतेच पाहत राहिले. आणि नंतर त्यांनींच बोलायला सुरुवात केली, " आपला लग्नाचा विचार नाहीं वाटतं ? "

पांडुरंग खूप लाजला.

" मींच तुम्हांला एक-दोन दिवसांत या बाबतींत विचारायचं ठरवलं होतं."

पांडुरंग गोंधळला—

" माझी मुलगी पाहिली आहेच तुम्हीं– नाकारण्यासारखी आहे असं मला वाटत नाहीं."

" कुणाला ?–मला देणार आपण मुलगी–? " पांडुरंग आश्चर्यानें उद्गारला.

" होय, तसा माझा निश्चय झाला आहे. आपली संमति असली तर ! "

" पण माझी सांपत्तिक स्थिति—"

इतक्यांत तो विमा-एजंट तिथें अवतरला आणि अनाहूतपणें मधेंच म्हणाला—

" सांपत्तिक स्थिति ? नसेना का चांगली—यांचा पांच हजारांचा विमा आहे हं ! "

हें वाक्य ऐकतांच शकुंतलेचे वडील खूप हसले. " म्हणजे–तुझ्याच विमा-कंपनींत असेल ? तूं आपला डाव साधलास होय अगोदर ?—"

" धंदा म्हणजे धंदा ! आम्ही, आम्हांला मिळणाऱ्या कमिशनमधून जरी पार्टीला कमिशन देत नसलों, तरी नाना ठिकाणीं आमच्या ओळखी असतात. एकमेकांच्या गरजा आम्हांला माहीत असतात. तेव्हां आमच्यातर्फे विमा उतरणाऱ्या सगळ्यांकडे आम्ही नातलगांच्या दृष्टीनेंच पाहत असतों; आणि

आमच्या विमेदारांचीं अशीं कामं आम्ही जमवून देत असतों. पण तीहि सचे-पणानं हं—भद्रेश्वरीपद्धतीनं नव्हे ! आतां, शकुंतलाताईसारखं रत्न ज्याला मिळणार त्याचा पांच हजारांचा विमा नको ? ”

येवढें म्हणून तो विमा-एजंट केवढ्यांदा तरी हसला !

“ काय पांडुरंगपंत—? ”

पांडुरंगपंत काय म्हणणार ! त्या स्वार्थी माणसानें आपल्या स्नेह्याचें लग्न न जमवितां—

पांडुरंग आणि शकुंतला—

विवाहबद्ध—

झालीं !

---

## तोच आवाज! : : १४

कितीशांत झोप लागली होती मला. तो दिवस माझा एकंदरींत आनंदांतच गेला. मनाला धक्के बसणारे कांहींहि प्रसंग त्या दिवशीं अनुभवास आलेले नव्हते—किंवा आनंदाचा उद्रेक होईल असेंहि कांहीं झालेलें नव्हतें. समुद्रांतून चांदण्या रात्रीं जहाजानें संथपणें प्रवास करावा, तसा मी तो दिवस घालविला होता.

—आणि अशा दिवशीं झोपावयाला काय त्रास पडणार? एक वर्तमानपत्र वाचीत अंथरुणावर पडलों आणि गुंगलों केव्हां तेंच मला समजलें नाहीं.

—रात्रीं साडेअकरा-बाराचा सुमार होता त्या वेळीं. कांहीं तरी खुजबुजीनें मी जागा झालों. आदल्या दिवशींच रात्रीं आमच्या घरांत साप सापडला होता. त्यामुळें त्या खुजबुजीनें मी कांहींसा दचकलोंच. म्हणून रात्रीं दिवा बारीकपणानें तेवत ठेवूनच मी निजलों होतों.

—रात्र चांदणी होती.

—खिडक्या उघड्या होत्या.

—दिवस थंडीचे होते.

—ती खुजबूज मला सापासारखी वाटली. त्यामुळें थंडी मला अधिकच जाणवत होती. अंगावरचा रग अंगाखालीं गुरफटून घेऊन एक हात बाहेर काढून उशाशींच असलेल्या दिव्याची वात मीं मोठी केली.

—माझ्या टेबलाखालीं कसली तरी खुजबूज चालूंच होती.

—दोरीसारखें कांहीं तरी झुबकेदारपणानें हलल्यासारखें वाटलें मला. मी

जरा निरखून पाहूं लागलों आणि माझा मीच गालांतल्या गालांत हसलो. आमच्या घरची मनी मांजरी खुजबुजत होती तिथें.

मनी नुकतीच व्याली होती. तिला चार पिलें झालीं होतीं. एक अगदीं काळेंभोर होतें, एक तपकिरी रंगावर होतें आणि एक अर्धें काळें, अर्धें पांढरें असें होते. तीं तीन पिलें कुणी मागून नेलीं. कुणीं पळविलीं. खाली एकच राहिलें होतें. ते अत्यंत मरतुकडें होतें. तें जीव धरील असें कधींच वाटलें नव्हतें. पण हालत होतें—जगत होतें. आणि या घरांतून त्या घरांत असें तेंच पिलूं घेऊन मनी अलीकडे हिंडत होती !

—ती मनीच आहे हें पाहून माझें मन निर्धास्त झालें. तोच मनी दाबलेल्या गळ्यानें हलके हलके ओरडूं लागली. 'गुरुरु म्यांव !—गुरुरु म्यांव !' फोनो-ग्राफची झिजलेली तबकडी वाजावी तसा तो आवाज होता.

—इतक्यांत मनीचें तोंड माझ्याकडे वळलें. तिच्या तोंडांत एक भला मोठा उंदीर होता. उंदीर अर्धवट मेलेला होता. मीं मनीला हाकलण्याकरितां वर्तमानपत्र तिच्या अंगावर भिरकावलें.

पण मनी जाग्यावरची हालली नाहीं. 'ठिस्स्' असा कांहींसा आवाज करून ती माझ्या अंगावर खेकसलीच व पुन्हा तिनें आपलें दबलेलें संगीत चालूं केलें.

तो उंदीर तिच्या तोंडांतून सोडवावा असें एकवार वाटलें मला. पण तो निर्दयपणाच झाला असता असें ताबडतोब माझ्या लक्षांत आलें. त्या उंदराचा प्राण वांचविण्यापेक्षां मरण्यानेंच तो खरा सुखी होणार होता. इतका तो अर्धमेला झालेला होता.

—मनीचें 'गुरुरु–म्यांव' चाललेंच होतें.

—इतक्यांत खिडकीच्या गजांतून एक पिटुकलें आंत आलें. मनीचें राहि-लेलें मरतुकडें पिलूं होतें तें. तडक आईचा कानोसा घेऊन तिच्याजवळ घुसलें.

उंदराचा जीव गेला.

पिलाला घास मिळाला.

पण तें वात्सल्य पाहून मला चमत्कारिक आनंद वाटत होता. मीं मनीला तेथून हाकलली नाहीं. उंदीर संपतांच मनीनें आपल्या पिलाचें अंग चाटलें

आणि त्याला कुशींत घेऊन मीं तिच्या अंगावर फेकलेल्या वर्तमानपत्राच्या कागदाची गादी करून तीं मायलेकरें माझ्या टेबलाखालींच झोपलीं.

—माझ्या मनाचा विरस झाला. माझी झोप चाबळली गेली. पहाटेपर्यंत मी अंथरुणावर अर्धवट गुंगींतच तळमळत होतों. एकाला मारायचें—आपल्या पिलांना घास द्यायचा. काय चमत्कारिच जीवनकलह आहे हा ? आणि निर्दय वृत्तींतहि वात्सल्याचा रस निर्माण होतो का ? कसलें वात्सल्य-—कसलें क्रौर्य—कसलें काय आणि कसलें काय ! अखेर पहाटे मी केव्हां तरी झोपीं गेलों.

—अर्थात् सकाळीं लौकर जागा झालोंच नाहीं ! आणि उशीरा उठूनहि किती आळसटलेला उठलों मी. उठलों, अंग झाडलें आणि रात्रीचा प्रसंग पुन्हा मला जसाच्या तसाच आठवला. तसा माझ्या अंगांत कांहीसा चेव आल्यासारखें झालें. गादी मीं पायानेंच गुंडाळून दूर केली. माझें मन धुंद झालें होतें. मला वाटूं लागलें सगळीकडे क्रौर्यच चालू आहे—क्रौर्याचे चरक लागले आहेत; आणि त्यांतून—करुण-वात्सल्यादि रस निथळत आहेत. एकवार वाटे करुणवात्सल्यच चरकाला लावलें असून त्याच्यांतून क्रौर्याचें तत तेल ठिबकत आहे !

—कल्पना—कल्पना ! माणसांच्या कल्पनेचा फेस वर उसळतो आहे; आणि त्या फेसाखालीं परमेश्वराचें जीवनकलहाचें यंत्र आपल्या ठराविक गतीनें आणि नित्याच्या तादात्म्यानें फिरत आहे !

—मनीसुद्धां उंदराचा घास करून किती तादात्म्यानें आपल्या पिलाला वात्सल्याची हाक देत होती ! ती वात्सल्याची हाक होती—का जीवनकलहाचे धडे देत होती ती आपल्या पिलाला ?

—उंदराच्या रक्ताची चटक ती आपल्या पिलाच्या जीभेला लावीत होती; आणि असें झालें नसतें तर तें पिलूं पुढें काय अजाणतेपणानें उंदराशीं खेळले असते का गोडीगुलाबीनें ?

—खरेंच काय केलें असतें त्या पिलानें पुढें ? त्याला उंदराच्या रक्ताची चव त्याच्या आईनें चाखविली नसती तर ?

—नुसत्या दुधभातावर असें एक पिलूं पाळून पाह्यचें असाहि एक वेडा विचार माझ्या मनांत आला.

—पण लगेच वाटलें– किती आचरट विचार आहे हा. तारुण्यांत प्रवेश करतांच तारुण्ययुक्त भावनांचा कानोसा जिवाला कोण देतें ? तसेंच उंदीर पाहतांच अगदीं एकादशी व्रतानें वाढविलेलीं मांजरेंसुद्धां उंदरावर झेपच नाही का टाकणार ? क्रूरतेच्या या जन्मजात वृत्तींचा निरास जग नाहींसें झाल्याशिवाय होणें शक्य आहे का ?

—उंदरावर झाप टाकण्याकरितां मांजर जशी समाधि लावून बसते तशी सोवळेपणाचीं– शांततेचीं– समतेचीं– जीं ढोंगे सोंगे दिसतात तीं समाधि लावलेल्या मांजरासारखीं–सर्व जनावरांची–जीवांची–मानवांची परमेश्वरसूचित बैठकच असते का ?

—कोवळेपणांत उदय पावलेला दिवसहि आतां काळाच्या चरकाला लागला होता. दिवसाची कोंवळी सालडी चरकाला लागून त्यांतूनच उन्ह फुटलें होतें. ताज्या रक्ताला चकाकी असावी त्याप्रमाणें उन्हहि तळपत होतें.

असल्या विचाराने आणि रात्रीच्या जागरणानें दुपारचें जेवण होतांच मी आहरलों; आणि डोक्याचा त्रास घालविण्याकरितां जसे कांहीं लोक नशा करतात तसा मी झोपेच्या स्वाधीन झालो.

—दिवस पूर्णपणें पिळून निघाला होता. त्याच्या अंगांतलें तेजाचें रक्त गळून गेलें होते; आणि राहिलेली काळी कातडी–जगावर पांघरुणासारखी तेवत होती. रक्ताचे वाळून डाग पडावेत त्याप्रमाणें दिवसाच्या कातड्यावर वाळलेल्या रक्ताचे ठिपके चांदण्यांच्या रूपानें दिसूं लागले !

—अशा वेळीं मीं जागा झालों ! आणि आतां रात्र कशी घालवायची या विचारांत पडलों. दुपारच्या झोपेचा माझ्या मनाला भयंकर कैफ चढला होता.

—मी तसाच उठलो आणि बाहेर पडलों. चांगली पांचसहा मैलांची चक्कर मारली. दुपारच्या झोपेचा कैफ कमी करण्याकरितां वाटेंत दोनतीन ठिकाणीं चहा ढोसला.

—मन थोडेंसें शांत झालें होतें.

—रात्रीचे अकरा वाजून गेले होते.

—झाडून-झटकून अंथरूण घातलें. स्वस्थ पडलों. आज लवकर झोप येणें मला शक्य नव्हतें, पण नुसता डोळे मिटून पडलों होतों.

—पुष्कळ वेळानें डोळ्यांवर थोडी सुस्तीहि आली.

—आणि–आणि पुन्हा जागा झालों, आणि कसला तरी कानोसा घेऊं लागलों.

होय. तोच आवाज! मनी मांजरीच अंगणांत भटकत होती. आवाज कालच्यासारखाच दाबलेला येत होता.

—मला चीड आली—कालचाच प्रसंग पुन्हा!

—पण ती माझी कल्पनाच होती.

—मनी आतां खोलींत येऊं नये म्हणून मी तिला हाकलायच्या तयारीनें उभा राहिलों.

—पण बराच वेळ वाट पाहूनहि मनी माझ्या खोलीत आली नाहीं. तेव्हां मीच खिडकींत उभा राहून तिची चाहूल घेऊं लागलों; आणि सपाट्यांत आली तर तिच्या तोंडांतला अर्धवट मेलेला उंदीर सुटावा म्हणून तिच्या अंगावर फेकण्याकरितां...

—पण मनीच्या तोंडांत आज कांहींच नव्हते!

—मग ही अशी दाबलेल्या आवाजानें कां ओरडते आहे?

—आणि इतक्या हाकेनंतरहि तिचें पिलूं तिच्याजवळ घोटाळायला कां येत नाहीं!

—आज तिच्या तोंडांत उंदीर नव्हता म्हणून?

इतक्यांत वाड्यांतील एक बाई मनीला हाकलीत म्हणाली—"काय परमेश्वरानं मायामोह निर्माण केला आहे पाहा! अहो, जपतां जपतां मनीचं राहिलेलं एक पिलूं बोक्यानं नेलंन् ना उचलून आत्तांच!"

माझी मान झटकन् ताठ झाली!

आज मनीच्या तोंडांत उंदराचा लचदा नव्हता, पण पोटच्या पोराच्या मृत्यूच्या कल्पनेचा बोळा होता.

—काल उंदीर तोंडांत धरून ती आपल्या पोराला हाक मारीत होती! आजहि ती आपल्या पोराला हाकच मारीत होती ना?

—पण प्रसंगांत किती भिन्नता?

—आणि मग तिचा कालचा आणि आजचा.आवाज एकच कसा?

—का सुखाच्या आणि दुःखाच्या तन्मयतेंत एकच संवादी सूर असतो ? सुखाची सीमा म्हणजे तन्मयता आणि दुःखाची सीमा म्हणजे तशीच आनंददायी तन्मयता असते का ?

—असते का माहीत नाहीं, पण मनी काल्च्याच आवाजानें हाक देत होती !

—मग मनुष्य इतका दुःखाला भितो कां ?

—आणि सुखाला हपापतो कां ?

—आणि परमेश्वरानें तरी यांत काय चातुर्य दाखविलें ?

—काल मनीच्या तोंडांत उंदीर देऊन तो तिच्याकरवीं तिच्या पोराला भरविला.

—आणि त्या उंदरावर पोसलेलें तें पिलूं आज बोक्याच्या घशांत घातलें !

—अशी दुहेरी हत्या साधण्यापेक्षां— मांजरीलाच तिचें पोर खायला लावलें असतें तर—?

—पण परमेश्वर हा अत्यंत चतुर लेखक आहे. प्रसंगांचें न सुटणारें जाळें वाढविण्याकरितां आणि त्याच्या लेखनाची जादू जगावर कायम टिकविण्याकरतां तो एकाची मान दुसऱ्याच्या तोंडांत—एकाचें शेपूट तिसऱ्याच्या घशांत—असे कथानकाचे पेच निर्माण करतो—

—पण परमेश्वराच्या या लेखनाचा आनंदाची शेवट आम्हांला कधीं पाहायला मिळणार आहे का ?

—सुखाच्या किंवा दुःखाच्या अत्युच्च शिखरावर आरूढ होऊन मनाला तन्मयता आली—की परमेश्वराच्या भावनेचा कांहीं तरी कानोसा लागल्यासारखें आपणाला वाटतें; पण तोच कैफ उतरला कीं—

—आपला हात कुणाला मारण्याकरितां आणि आपल्या मानेवर कुणाचा हात पडणार आहे या धागधुगींत मनुष्य जगायला लागतो !

—जरा स्वस्थ बसलों, कीं मनी मांजरीचे ते दोन्ही आवाज—एक आदल्या दिवशींचा आणि एक दुसऱ्या दिवशींचा–दोन्ही कानांशीं दोन गजराचीं घड्याळें बांधावींत त्याप्रमाणें मला अद्याप ऐकूं येतात !

## राहिलेले शब्द !   :   :   १५

झिमझिम पाऊस पडत होता. संध्याकाळची वेळ होती. मी कांहीं तरी विचारांत रस्त्यातून चालले होतों. आजूबाजूला माझे फारसे लक्ष नव्हते. पडणाऱ्या पावसामुळे छत्र्या नसलेले लोक गोंधळले होते. कुणी एखाद्या घराचा अगर दुकानाचा आडोसा घेऊन भिजण्याचें टाळीत होते, तर कुणी अगदीं छाती काढून पाऊसपाण्यांत भिजत चालले होते. ते दृश्य पाहून माझ्या मनाला कांहीं तरी गंमत वाटत होती. मी आपला आपल्याशींच हसत कांहीं तरी विचारतंद्रीत छत्री सावरीत चाललें होतों. इतक्यांत एका दुकानांतून मला हाक ऐकायला आली. मी चमकून मागें पाहिले.

"अहो, तेवढें जरीचें पातळ सांगाना परत करायला." एक साठ बासष्ट वर्षांचा म्हातारा दुकानांत बसून मला हुकूम सोडीत होता.

मी त्या म्हाताऱ्याकडे पाहतच राहिलों. मला त्याच्या म्हणण्याचा कांहींच अर्थ कळेना.

हा म्हातारा कोण? कुणाचें जरीचें पातळ? कां परत करायचें?

"मग सांगतां ना तेवढा निरोप? तुमच्या ओळखीनें दिलें आम्हीं त्यांच्याकडे रंगवायला—तीन महिने होऊन गेले. ही काय रीत झाली? आणि तुम्हीं मारे अगदीं झाकीत सांगितलेंत आमच्या खात्रीचा माणूस आहे म्हणून!" म्हातारा आपली बाजू मांडीत होता.

मी त्याच्याकडे पाहून फक्त गालांतल्या गालांत हसत होतों.

"कां, आतां बोलत कां नाहीं?" तो वयोवृद्ध म्हणाला.

" मला कोण समजतां तुम्ही ? मी दुकानाच्या पायरीवर पाऊल टेकून व रेलून विचारलें.

माझ्या या प्रश्नानें मात्र तो गृहस्थ बावचळला. आपलें कांहीं तरी चुकलें आहे असें त्याला वाटलें. त्यानें आपल्या डोळ्यांचा चष्मा उपरण्याच्या पदरानें पुसला व पुसतां पुसतांच तो मला म्हणाला,

" म्हणजे तुम्ही बाबूराव देशपांडे ना ? "

" नाही ! " मी शांतपणें म्हटलें.

" मग माफ करा हं. चूक झाली माझी कांहीं तरी ! अहा, छत्री टाकली आहे नीट करायला—काड्या मोडल्या आहेत म्हणून; आज सहा दिवस झाले. आत्तां पाऊस पडायला लागला म्हणून चिडीनें छत्रीशिवायच निघालों—त्या छत्रीवाल्याकडे—दुकान बंद बेट्याचे ! म्हणून या शिंप्याकडे आलों—इथेंहि शिवायला दिलेले कपडे तयार नाहीत ! पावसातून आल्यामुळें चष्म्याच्या काचा भिजल्या आहेत पावसाच्या पाण्यानें—आणि त्यांतून या दिव्यांचा उजेड !— थोडीशी गफलतच झाली बघा. मला वाटलें आपण—बाबूराव देशपांडेच ! अहो, आमचें हें पेन्शनीचें आयुष्य म्हणजे हें असें नुसतें हेलपाट्यांतच जातें बघा ! छत्री नीट करायला दिली—वेळेवर मिळायची नाहीं ! कपडे दिले शिवायला—घाला हेलपाटे ! त्या पातळाची तीच गत ! एकजण वेळेवर काम करील तर शपथ ! आणि पुनः आमची पाठ फिरली कीं, म्हणायचेच—या म्हाताऱ्यांची पिरपिरच फार ! अहो, परवां असेच चार ठिकाणीं हेलपाटे घालून आलों. कामं झालीं नाहींतच कुठें—आणि सहज आमच्या मुलाच्या टेबलावर एक नवीन पुस्तक दिसलें, म्हटलं बसावं जरा वाचीत—पहिलेंच पान उघडलें तों त्यांत पेन्शनरांची आणि म्हाताऱ्यांची टवाळी ! अरे, कां रे बाबांनो असं ? सबंध आयुष्याच्या मातींत जेवढं सोनं सांपडलं तेवढं तुमच्याकरितां ठेवून निघून जाणारीं माणसं आम्ही—"

" बरं मग मी जाऊं आतां ? " मीं मधेंच म्हटलें.

"—कोणच्या बाजूला जायचं आहे तुम्हांला ? "

" ह्या पलीकडच्याच बोळांत—"

" अरे वा, मग आमच्याच घराकडे ! मग काय देऊं का आणखी थोडासा त्रास तुम्हांला ? येतों झालें आतां तुमच्याच छत्रींत—" आणि म्हातारा दुकानाच्या खालीं उतरूं लागला.

त्यांना येऊं नको म्हणणें मला आतां शक्यच नव्हतें, आणि मला तशी इच्छाहि नव्हती. पण मीं म्हटलें, " चला की, त्यांत कसला आला आहे त्रास ? "

आम्ही दोघे एका छत्रींतून वाट चालूं लागलो.

दुकानांतील माणसें मिस्कीलपणानें आमच्याकडे पाहून हसत होतीं.

जातांना आम्ही सर्व विषयांवर बोलत चाललों होतो.

" म्हणजे तुम्हांला अजून पुढेंच जायचें आहे का ? " एका घराशीं थांबत तो वृद्ध म्हणाला. " हें आमचें घर—या की पांच मिनिटें वेळ असला तर–"

" आजच नको—येईन पुन्हा केव्हां तरी ! "

" आतां काम नाहीं ना कांहीं विशेष घाइचं ? मग आतांच या ! अहो, असल्या तुटपुंज्या ओळखीवर पुन्हा कोण येणार अगत्यानें ? बसा पांच-दहा मिनिटें आणि जा पाऊस थांबल्यावर ! "

—माझ्या मनांत तरी कुठें बाहेरच्या बाहेरच जायचें होतें ? मी फक्त आग्रहाचीच वाट पाहत होतों. मी त्या वृद्धाच्या मागोमाग घरांत शिरलों.

—घरांत शिरतांच प्रशस्त अंगण होतें. ओटीवर एक दिवा लावलेला होता. ओटीवर एक बाक ठेवलेलें होतें. एक जुनाट घड्याळ आपल्या अस्पष्ट झालेल्या आंकड्यांनीं वेळ दाखवीत होतें.

आम्ही ओटीवर येतांच त्या वृद्धानें आपले कपडे ओटीवरच्या खुंटीवर काढून ठेवले आणि घरांत डोकावीत म्हटलें, " अरे, शिरू-महादू आले का रे बाहेरून ? —अरे, हीं वासरं आतां मोठीं झालीं नाहीं का ? त्यांना आतां शिरू-महादू नाहीं म्हणतां कामा. एक श्रीरंगराव आणि एक माधवराव. हे दोन मुलगे हं माझे. खूप रागावतों मी त्यांच्यावर, कीं तुम्ही फार बिघडलांत–वायां गेलांत, अगदीं वगैरे ! पण खरं सांगूं का ? आपल्याला मनांतून पसंत असतं त्यांचं वागणं. –हें आमच्या मालकीचं घर—"

इतक्यांत आंतल्या जिन्यांत दोन साधारण माझ्याच वयाचीं माणसें खालीं आलीं. त्यांजकडे पाहत तो वृद्ध म्हणाला, "अरे, रस्त्यांत एखादी ठेव सांपडावी ना त्याप्रमाणें आम्हांला आज हे एक नवीन स्नेही लाभले आहेत— आज हवेंत गारवा आला आहे नाहीं फारच– मग यांना आतां चहा देणार का दूध ?"

तीं दोघें माझ्याकडे पाहतच राहिलीं. आणि मींहि स्वतःच्या घरीं असल्या-सारखेंच म्हटलें, "आपला चहा बरा बुवा अशा वेळेला !"

"बरं तर सांगा चहा करायला."

—तीं दोन्ही माणसे आंत गेलीं.

"हे आमचे मुलगे–ओळखलंच असेल तुम्ही. काय गंमत आहे पाहा—मी आपल्याकडनं यांच्याशीं खूप बोलण्याचा प्रयत्न करतों; पण काय असेल तें असो– मुलं आपलीं माझ्यापुढं मुग्ध असतात. बरं हें आमचं झालं सगळं– तुमचं नांव काय ?"

मीं हसत म्हटलें, "–पण तुमचें तरी नांव तुम्ही कुठें सांगितलें आहेत अद्याप ?"

"—अरे हो राहिलंच की–माझं नांव विश्वनाथ बळवंत रानडे–जात ब्राह्मण —उमर वर्षें बासष्ट–धंदा पेन्शनर." तेंहि हसत हसतच म्हणाले.

—नंतर आम्हीं त्या पहिल्याच भेटींत खूप गप्पा मारल्या. स्टेशनवर पोहोचवायला आलेलीं माणसें व गांवाला जाणारीं माणसें स्टेशनवर पांच-दहा मिनिटांत जितक्या जिव्हाळ्यानें बोलून घाईघाईनें सर्व प्रश्नांना हात लावून जातात– त्याचप्रमाणें आमचें चाललें होतें.

अखेरशेवटीं ओटीवरच्या घड्याळानें नऊ ठोके वाजविले, तेव्हां आम्ही दोघेहि भानावर आलों.

"बरं जातों; येईन आतां पुन्हा केव्हां तरी–" असें म्हणत मी उठलों.

विश्वनाथपंतांना घरांत विसूभाऊ म्हणत. विसूभाऊंच्या घरांतील मंडळींनीं 'जेवायचें झालें आहे' अशा निरोपाची दोन-तीन वेळ मध्येंच चाहूल दिली होती; पण विसूभाऊंनीं आतांपर्यंत तें मनावरच घेतलें नव्हतें. माझ्या तें लक्षांत येऊन–मी मधेंच चुळबूळ करी; पण लगेच विसूभाऊ म्हणत—

" बसा हो, जाल आतां " आणि माझ्या मनावरहि विसूभाऊंनीं पहिल्याच भेटींत काय मोहिनी टाकली होती कुणास ठाऊक, मीहि मजेंत वेळ काढीत होतों.

—विसूभाऊ मला दरवाजापर्यंत पोंचवायला आले. दरवाजांत त्यांचे दोन मुलगे उभे होते. आम्ही दोघे दरवाजांत येतांच ते माझ्याकडे हसऱ्या नजरेनें पाहत घरांत गेले. त्या त्यांच्या हसण्यांत टवाळी नव्हती—तर एक प्रकारचा आदर होता. ते कांहीं तरी कुतूहलानें माझ्याकडे पाहून हसत होते.

—काय बरें त्यांचें कुतूहल असेल ? आमची विजोड मैत्री का ? विसूभाऊंच्या मुलांयेवढेंच माझें वय होतें; पण किती सलगीनें बोलत होते विसूभाऊ माझ्याशीं ? विसूभाऊंच्या निम्यानें माझें वय होतें.

मी विसूभाऊंच्या घरांतून बाहेर पडलों. मध्यंतरी पाऊस थांबला होता. मी बाहेर पडतांच पुन्हा अभिषेकाला सुरुवात झाली. मी ताडकन् छत्री उघडली आणि जिथें जाण्याकरितां म्हणून मी घरून पावसांतून निघालों होतों तिथें न जातांच सरळ घरीं परत फिरलो.

* * *

—आणि त्या दिवसापासून आम्ही एकमेकांना भेटल्याशिवाय एक आठवडाहि जात नाहींसा झाला. आजूबाजूला आमच्या या विजोड मैत्रीचा खूप गाजावाजा झाला होता.

—कांहीं कांहीं वेळेला मी माझ्या बोलण्यांत साठ वर्षांचा पोक्तपणा आणी तर कांहीं कांहीं वेळेला विसूभाऊ तिसाव्या वर्षींचा दर्प आपल्या बोलण्यांत आणीत.

—विसूभाऊंचीं मुलें माझ्याकडे फारच कुतूहलानें पाहत असत. मीं त्यांच्याशीं मनमोकळें बोलण्याचा खूप प्रयत्न करून पाहिला. पण तो कधींच यशस्वी झाला नाहीं. बहुतेक मी त्यांच्या वडिलांचा स्नेही झाल्यामुळें—तीं माझ्याच वयाचीं तरुण पिढी माझ्याशीं मोकळया मनानें बोलत नव्हती !

—या गोष्टीला पांच-सहा महिने झाले होते. विसूभाऊंच्या बोलण्यांतला

प्रसाद अलौकिक होता. गजबजलेल्या शहरावरून विमानानें घिरट्या घालाव्यात त्याप्रमाणें त्यांचें बोलणें आणि विचार यांची झेप नेहमी वरची असे. वाळलेला भोपळा जसा नवशिक्यांना पोहायला शिकवितो त्याप्रमाणें विसूभाऊंचे पुष्कळसे विचार मला आधारासारखे वाटत. तरुण माणसानें ज्ञानेश्वरीच्या प्रवचनाला नेहमी जावें त्याप्रमाणें मी विसूभाऊंच्या बोलण्याच्या प्रवचनाला सवड सापडेल त्याप्रमाणें जात असे.

—पण प्रत्येक वेळेला माझ्या मनांत विचार येई कीं, विसूभाऊंच्या या बोलण्याचा फायदा त्यांचीं खुद्द स्वतःचीं मुलें कां करून घेत नाहीत ?

—घरच्या वृक्षाचीं फुलें वारसाला मिळूं नयेत आणि शेजारच्या माणसाला तीं हक्कानें मिळावीत याचा अर्थ काय ?

मीं एक दिवस विसूभाऊंना तसें विचारलें सुद्धां. ते म्हणाले, " कां कुणास ठाऊक; पण तसें जमत नाहीं हें खरें बुवा ! मीं पुष्कळ वेळेला तसा मुलांशीं बोलण्याचा प्रयत्न करून पाहिला–पण कांहीं वेळेला मुलें जास्त सलगी करतात असें मला वाटे आणि कांहीं वेळेला मुलें हवा तितका मोकळेपणा धरीत नसत. शेवटीं सोडून दिला मीं तो प्रयत्न ! पण तुमच्या बाबतींत मात्र मला तसें कांहीच वाटत नाहीं बुवा ! तुम्ही मला लहानहि वाटतां आणि मोठेहि वाटता ! "

" मीं म्हटलें, 'असं असं व्हावं—किंवा असं असं असायला कांहीं हरकत नाहीं,' असं आपल्याला पुष्कळ गोष्टीबद्दल वाटतं—पण तसं तसं व्हायला कांहीं मार्गच सांपडत नाहीं; आणि मग त्या वेळेला आपल्या मनाला एक प्रकारची गोड उदासीनता येते आणि मग त्या उदासीनतेंतच आपल्याला कौतुक वाटतं आणि—"

" असं होतं खरंच हं पुष्कळ वेळेला ! दोऱ्याच्या रिळाचं टोंक कांहीं आपल्याला चटकन् सांपडत नाहीं—पहिलीं दोन-चार मिनिटें आपण टोंक पाहण्याचा प्रयत्न करतों आणि मग लगेच कंटाळून कुठें तरी मधेंच दोरा तोडून आपण नवें टोंक निर्माण करतों, त्याप्रमाणें संसारांतल्या पुष्कळ गोष्टींचें असतें नव्हे ? " विसूभाऊ म्हणाले.

*　　*　　*

पाऊस पडायला लागला की, आपणाला वाटतें सगळीकडेच पाऊस पडतो आहे; पण पावसाला कुठें तरी सुरुवात झालेली असते आणि कुठपर्यंत तरी तो पडत असतो. सगळीकडेच कांहीं तो एकाच वेळीं पडत नसतो. इथें पाऊस पडतो आहे आणि तिथें पडत नाहीं असें कांहीं एकाच वेळेला आपणाला फारसें पाहावयाला सापडत नाही !

—कारण नसतांना असे कांहींसे विचार माझ्या मनांत चालले होते. त्या वेळीं मी सायकलवरून चाललों होतों. गुराख्याची नजर चुकली की, जनावर ज्याप्रमाणें आपल्या घरची वाट चालूं लागतें त्याप्रमाणें मी विचारांत आहेसें पाहून माझ्या हातांनी माझी सायकल विसूभाऊंच्या घराकडे वळविली. वास्तविक मी कांहीं तरी जरूरीच्या कामाकरितां निघालों होतों. मला एक क्षणहि मधें थांबायला फुरसत नव्हती.

माझी सायकल विसूभाऊंच्या घरावरून चालली होती. विसूभाऊ आपल्या चिमूटभर शेंडीचा कापूस सावरीत दरवाजाला टेकून उभे होते.

मला पाहतांच त्यांनीं अत्यंत उत्कंठेनें मला हाक मारली.

"या हो जरा—"

"नाहीं, जरा कामांत आहे—" मी अत्यंत आर्जवीपणानें म्हटलें.

"थोडं—एक पांच मिनिटं—बोलायचं आहे तुमच्याजवळ—तसंच महत्त्वाचं आहे !"

"संध्याकाळीं अवश्य येतों—आतां अगदीं नाइलाज आहे !" असें म्हणत आणि त्यांच्या संमतीची वाट न पाहतांच मीं जोरानें सायकल दामटली.

* * *

त्याच दिवशीं मला अनपेक्षितपणें बाहेरगांवीं जावें लागलें.

—नंतर जवळ जवळ पंधरा-वीस दिवसांनी मी परत आलों.

—नंतर आठ-दहा दिवस माझे कामांतच गेले. एक दिवस "संध्याकाळीं अवश्य येतों" म्हणून विसूभाऊंना कबूल केल्याची मला आठवण झाली. मी चमकलोंच.

मीं लगेच घाईघाईनें कपडे केले आणि सायकलवरून त्यांच्या घरीं गेलों.

त्यांच्या घरीं जातांच मीं अधीरतेनें सायकल भिंतीला टेकून ठेवीत आरोळी ठोकली, " विसूभाऊ आहेत का ? "

—मला वाटतें त्या वेळेला माझ्याकडे कुणी तरी चमत्कारिक पाहिलें.

मीं पुन्हा विचारलें, " विसूभाऊ आहेत का ? "

वाड्यांतीलच कुणी तरी सांगितलें, " विसुभाऊ जाऊन आज आठ दिवस झाले. शेवटीं शेवटीं ते तुमची सारखी आठवण काढीत होते ! "

तें ऐकून माझे पाय लुळे पडल्यासारखे झाले. दोन-तीन मिनिटें मी तसाच कसा तरी अजागळासारखा उभा होतों आणि शेवटीं मनाचा कांहीं तरी निश्चय करून घाईघाईनेंच मीं आपली सायकल घेतली आणि परत फिरलों.

माझ्या कानांत ते विसूभाऊंचे शब्द घुमत होते,

'थोडं बोलायचं आहे तुमच्याजवळ- एक पांच मिनिटं- तसंच महत्त्वाचं आहे ! '

काय बोलायचें होतें विसूभाऊंना माझ्याजवळ ?

—कोणते शब्द बोलायचे राहून गेले होते त्यांचे ?

—सायकलवर बसून मी माझ्या घराकडे यायला वेगांत निघालों होतों; पण पाठीमागें पाहायचा मला धीर होत नव्हता.

—विसूभाऊंचे बोलायचे 'राहिलेले शब्द' माझ्या पाठोपाठ येत आहेत असें मला वाटत होतें.

—मी घरीं आलों; माझें चित्त कुठेंच लागेना.

—ते राहिलेले शब्द काय असतील याचीच मी कल्पना करीत होतों !

—त्यांना मृत्यूपूर्वीं वाटते ती उदासीनता वाटायला लागली होती आणि त्याच आवेगांत ते आपल्या आयुष्याचें सर्व सार मला त्या पांच मिनिटांत सांगून टाकणार होतें काय ?

—त्याच पांच मिनिटांत ? मग इतक्या दिवसांत त्यांनीं मला कांहीं सांगितलें नसतें का ? हो खरेंच, आयुष्यभर अर्जुनाचें सारथ्य आणि सान्निध्य करणाऱ्या भगवान् श्रीकृष्णानें नाहीं का भगवद्गीता अशी थोडक्याच वेळांत सांगून टाकली ?

विसूभाऊंचे ओठ अद्याप कांहीं तरी सांगण्याकरितां माझ्यासमोर हालत आहेत असा मला भास होत होता.

आणि मला वाटलें सांगणारे ओठ आणि ऐकणारे कान यांची गांठ योग्य वेळीं पडत नाहीं म्हणूनच जगाचें कोडें अद्याप गूढ राहिलें आहे. नाहीं तर जगाच्या येवढ्या मोठ्या थोरल्या आजपर्यंतच्या आयुष्यांत जगाचें कोडें कोणी तरी थोडथोडें मिळून एव्हांना संपूर्ण सोडविलें नसतें काय ?

—का पिणारें वासरूं, आपणाला दूध मिळावें म्हणून, आपण गाईपासून मुद्दाम ओढतों त्याप्रमाणें जगाचा गुराखी तो परमेश्वर—जगाची जादू त्याच्या करमणुकीकरितां कायम ठेवण्यासाठीं असला क्रूरपणा नियमितपणानें करीत असतो ?

त्या राहिलेल्या शब्दांची आठवण झाली, कीं अद्याप माझें मन बावचळून जातें !

---

# आम्ही येथें येऊन गेलों ! : : १६

मुलानें सहज खेळतां खेळतां चेंडू वर फेकला आणि तो आमच्या घराच्या छपरावर अडकला, त्याला आज सात-आठ दिवस होऊन गेले होते. तो चेंडू काढून देण्याबद्दल मुलें माझ्या पाठीमागें लागलीं होतीं. आणि 'आत्तां', 'मग' असें करतां करतां आठ दिवसांचा काळ मीं मध्यें काढला होता !

आज रविवार होता. रविवार असूनहि आज माझ्याकडे कोणी आलें नव्हतें. त्यामुळें मी अनायासेंच पोरांच्या तडाक्यांत सापडलों. उघडया अंगानेंच मी अंगणांत फिरत होतों. पोरें पाठीमागें लागलीं. मीं चेंडू काढून देण्याकरितां कौलघरावर चढूं लागलों.

शिडीवरून वर चढतां चढतां माझी वृत्ति विनाकारणच उत्साहित व्हायला लागली. आपण कांहीं तरी 'नवें पाहत आहोंत' असा आनंद माझ्या चेहऱ्यावर दिसूं लागला.

मी कौलघरावर उंचावर येऊन उभा राहिलों; आणि तेथून जें मला आजूबाजूचें दृश्य दिसूं लागलें तें पाहून मी कशाकरितां वर चढलों आहे हें अजीबात विसरून गेलों आणि शंकित आनंदानें सभोंवार कावराबावरा पाहूं लागलों.

माडीवर उभें राहून जें दृश्य दिसतें— अगदीं चौथ्या मजल्यावर उभे राहिलांत तरी— त्यापेक्षां कौलघरावरून असें पाहिलेलें दृश्य सर्वांत जास्त उन्मादकारक असतें ! कारण कौलघरावर उभे राहिलों, कीं आजूबाजू मोकळ्या असतात ! आपणांस आपल्यास सावरावयाचें आहे ही जाणीव असते !

मी अगदीं कौलघराच्या मध्यावर--चेंडू पाहतां पाहतां–जाऊन उभा राहिलों. कौलघरावर खूप पाला-पाचोळा पडला होता आणि त्यांतच कुठें तरी चेंडू लपून बसला होता !

मी कौलघराच्या मध्यावर होतों –आणि चटकन् माझ्या लक्षांत आलें, कीं माझ्या आयुष्याच्याहि बरोबर मध्यावर मी उभा आहे ! कौलघरावरून दिसणाऱ्या या बाजूच्या आणि त्या बाजूच्या दृश्याकडे पाहतां पाहतां मी माझ्या आयुष्याच्या एका भागाकडे— गेलेल्या भागाकडे— मनांतल्या मनांत पाहूं लागलो. आणि—

—आणि लहानपणीं साधारण कळूं लागल्यानंतर मोठेपणाच्या आयुष्या-बद्दल केलेलीं मनोराज्यें मला आठवलीं; आणि या टोकाचे एकदम त्या टोकाला जावें—त्याप्रमाणें एकदम माझी आजची स्थिति मी न्याहाळूं लागलों.

—लहानपणीं केलेलीं मनोराज्यें कल्पनेपेक्षां किती तरी जास्त पटींनीं माझ्या पदरांत पडलीं होतीं !

—पण हाय !

—मी आज कांहींच मनोराज्यें करूं शकत नव्हतों !

—कारण मीं केलेलीं मनोराज्यें इतक्या उशिरा माझ्या पदरांत पडलीं होतीं, कीं आतां एखादें नवें मनोराज्य करण्याचा माझ्या मनाला हिय्या होणें शक्य नव्हतें ! मनोराज्यें केल्यानंतर तीं पदरांत पडण्याकरितां इतका कालावधि मधें जाऊं देण्याची आपली तयारी नव्हती ! मनोराज्यें केलीं–पदरांत पडलीं–बस् झालें ! त्याच त्याच वेदना जिवाला पुनः पुन्हा नकोत ! मनोराज्यें केलीं–मनाचा ताण सोसला–त्याचें सुख अनुभवलें; पुन्हा तें सुख नको–मनाला तो ताणहि नको—

—मी चेंडू शोधूं लागलों.

—आणि मनाला वाटलें आपणहि आपल्या सुखाचा चेंडू असाच मनो-राज्याच्या आवेगांत कुठें तरी उंचावर भिरकावतों आणि मग बसतों त्याची शोधाशोध करीत ! शोधाची धावपळ मात्र आपलीच ! त्या चेंडूला काय—आपल्या हातांत असायचा तो कुठें तरी असतो.

—बरं शोधाशोध करून, आपल्या सुखाचा चेंडू आपल्या हातीं पुन्हा लागला तरी तो काय आपण हातीं ठेवणार आहोंत ? पुन्हा आपल्या मनाच्या हालचालीबरोबर चेंडूची हालचाल होणार—पुन्हा आपण तो कुठें तरी लांब फेकणार ! —पुन्हा शोधाशोध ! आपणच चेंडूची फेकाफेक करून मागें-पुढे व्हायचें आणि—

* * *

आयुष्याच्या गणिताला एकदां रीत बसल्यानंतर नुसती आंकडेमोड करीत आयुष्य काढण्याचा माणसाला कंटाळा येत असेल अगदीं !

—मग आयुष्य घालविणें आणि एखाद्या बाईनें चहा करीत बसणें रीत एक !

घरधन्यानें सांगावें " तीन कप चहा— "

बाईनें ठराविक पातेलें घ्यावें. तीन कप पाणी— तीन चमचे साखर, ठराविक चहा-दूध—झाला चहा तयार —पुन्हा भांडीं विसळायचीं, जाग्यावर ठेवायचीं–पुन्हा घरधनी ओरडला " चहा पाहिजे ! " कीं पुन्हा तोच खटाटोप !

तसेंच माणसाच्या आयुष्याला एकदां रीत बसली. पगाराची तारीख— किंवा धंद्यांतली मिळकत– त्यांत वाणी-भंडई, कापड-चोपड, बेरीज-वजाबाकी ! कीं पुन्हा दुसरा महिना चालू—पण रीत मागील महिन्याचीच !

कसें ठराविक आंकडेमोडीचें आयुष्य काढायचें माणसानें ?

—आयुष्याला रीत बसेपर्यंतच मनुष्य महत्त्वाकांक्षी आणि सुखी असतो ! त्या वेळेपर्यंत बहुधा तो आपल्याविषयींच फक्त विचार करीत असतो. आणि एकदां स्वतःच्या आयुष्याला रीत बसल्यानंतर—

—जग काय आहे–जगाचें कसें चाललें आहे. माणूस म्हणजे काय--देव म्हणजे काय ? असल्या विचार-वावटळीला सुरुवात होते !

--मीहि आतां असल्या विचारवावटळींत सांपडण्याइतक्या परिस्थितींत आलों होतों.

---आणि फावल्या वेळांत विचार करायला लागलों.

—जग म्हणजे काय ?

—माणसाची इतिकर्तव्यता कोणती ?

—माणसानें आस्तिक असावें ?

—का नास्तिक असावें ?

—का कांहींहि नसावें ?

—नाना विचार ऐकायला येतात !

—पण मनाचें समाधान कशानेंच होत नाहीं !

—साधारण कुवतीचा मनुष्य असेल तर तो ज्या वेळेला जें मत ऐकेल तें त्या वेळेला त्याला खरें वाटतें; पण एकटा असला, कीं पुन्हा मनाची भगभग सुरू होते —

—हें म्हणजे काय—तें म्हणजे काय ?

—काय ? ? ?

—वारा भरून ठेवलेलीं रबरी चित्रें असतात ना—तसें माणसांचें आहे ! तीं वारा भरलेलीं चित्रें लहान मुलांच्या तडाक्यांत सापडलीं, कीं त्यांना कुठून तरी भोंक पडतें आणि मग तिथून वारा निसटायला लागतो ! तशीच माणसाच्या मनाला कुठें तरी, कसल्या तरी विचाराची जखम होते आणि लागतो त्याच्या विचाराचा वारा निसटायला !

त्या रबरी चित्राला मुलांच्या हातून अमक्याच ठिकाणीं भोंक पडेल असें जसें सांगतां येत नाहीं—तसेंच मनुष्य कसा बोलेल हेंहि सांगतां येत नाहीं. पण अशा सर्व बोलण्याचा सारांश काढला, तर मनांत भरतो त्यांतला फक्त विचारांचा भकासपणा !

आणि हा भकासपणा ज्याच्या मनाला तीव्रतेनें झोंबेल तो लागतो पिसाटासारखा वागायला ! "यांत काय आहे ?", "त्यांत काय आहे ?", "याची काय किंमत आहे ?", "त्याची काय किंमत आहे ?" आणि याच्यापुढचें वाक्य म्हणजे—

"सर्व म्हणजे ब्रह्म आहे !"

—मग सर्व लोक मुकाट्यानें त्याला साधु म्हणूं लागतात !

याच्या थोडया खालच्या पायरीवरचे जे लोक असतात त्यांना हा विचारांचा भकासपणा जाणवत नाहीं असें नाहीं; पण ते आपल्या आयुष्यावर त्याचा येवढा परिणाम करून घेत नाहींत ! मनांत निर्माण झालेल्या या भकासपणाच्या आडोशानें वावरूनच ते जगाचें सौंदर्य अनुभवीत असतात ! आपल्या

मताप्रमाणें त्याच्यांतूनच आनंद घेत असतात ! मला मोठा आदर वाटतो अशा लोकांबद्दल ! तरी विचारांचा भकासपणा त्यांनाहि सोडीत नाहीं--

—आणि हा विचारांचा भकासपणा उग्र रूप केव्हां धारण करतो ?

—शहरांत– गांवांत– नित्य परिचयाच्या ठिकाणीं नाहीं !

—मोकळ्या मैदानांत चला. आकाशाची कड जमिनीला भिडलेली जिथें दिसेल तिथें चला. आपल्याच नादांत तन्मयतेनें वावरणारे पाण्याचे ओघ, ओहोळ, नदी, नाले—समुद्र—

—बाप रे ! समुद्र पाहतांच माणसाचा भकासपणा काय भयंकर वाढतो आणि घुमेपणानें अस्ताव्यस्त वसलेले डोंगर पाहून ?

—किंवा एखाद्या दिवशीं स्वतःच्या कौलघरावर चढलें आणि आजूबाजूला पाहिलें तरीहि किती भकास वाटते !

—पावसाळ्या दिवसांत गडगडायला लागलें तरीहि असेंच वाटतें ! आभाळ कोंदटलें म्हणजेहि असेंच वाटतें !

—आणि एखादे वेळीं आपलें मनच कोंदटलें तर ?

—कुठें तरी मोकळेढाकळेपणानें पळत सुटावें असें तरी वाटतें; किंवा सर्व माणसें बाहेर हाकलून स्वतःला एकटें कोंडून घ्यावें असें तरी वाटतें !

—आणि या सर्वांची मला कल्पना आली मुलांचा चेंडू शोधण्यासाठीं स्वतःच्या घराच्या कौलघरावर चढलों तेव्हां !

आणि तेव्हांपासून ही भकासपणाची रुखरुख माझ्या मनाला एकसारखी तीव्रतेनें बोचूं लागली ! कोणतीहि गोष्ट करतांना मनाला असें वाटे, ' हें करून शेवटीं आपण मिळवायचें काय ? '

तरी पण मरायला माझी तयारी झालेली नव्हती. पण असें सुखासीन जगणें जगण्यांतहि मला कांहीं स्वारस्य वाटत नव्हतें !

वाटत नव्हतें कसें ? सुखासीन जीवित जगावेंसें वाटतच होतें, पण तसें जगण्याला मनाला समाधानकारक उत्तर हवें होतें !

जगण्याकरितां ज्याला राबावें लागतें त्याचें राबतां-राबतांच फिरणें होतें. आणि सुखासीन माणसाला मनाला रिझवण्याकरितां रिकामपणीं फिरायला बाहेर पडावें लागतें !

मीहि एका रविवारीं असेच चार स्नेही गोळा करून गांवाबाहेरच्या पद्मावती देवीला जाण्याकरितां बाहेर पडलों होतों.

रस्त्यानें आमचा असाच कांहीं तरी वादविवाद चालला होता

—की ज्याला शेंडाबुडखा कांहींच नव्हता !

—देवळाजवळ येईपर्यंत आम्ही सर्व दमलों होतो आणि त्यामुळें आमच्या चाललेल्या वादविवादांतून एकएकजण आपलें अंग काढून घेत होता. आणि मुकाट्यानें खालीं किंवा आजूबाजूला पाहत चालूं लागला होता.

—आम्ही देवळांत आलों. आमच्यांतल्या नास्तिक माणसांनीं देवीचें दर्शन घेऊन नमस्कार केला, आणि आस्तिक माणसांनींहि केला ! कारण तशी फारशी कुणाचीच आपल्या मताबद्दल खात्री नसते ! आस्तिक माणसानें नमस्कार केला विश्वास होता म्हणून; पण तो मनांतून नास्तिक नसावा हें तरी कशावरून ?

—आणि नास्तिक माणसाने नमस्कार केला—चुकून आस्तिक वाद खरा असला तर ? असावा आपला एक नमस्कार केलेला !

देवदर्शन झाल्यानंतर खाणेंपिणें आलेंच. तें झाल्यानंतर आम्ही पुन्हा परत यायच्या तयारीला लागलों.

—आणि भाकरीचा तुकडा खाल्ल्यानंतर कुत्रें जसे कांहीं वेळ तिथेंच घुटमळतें तसेंच आम्हीहि तिथें घुटमळत होतों.

आणि देवळाबाहेर असलेल्या पडवीवजा धर्मशाळेच्या कडीपाटाकडे माझें सहज लक्ष गेलें.

कुणी तरी खडूनें तिथें लिहून ठेवलें होतें—

**“ आम्ही येथें येऊन गेलों ! ”**

खालीं सही होती. आल्याची तारीख होती. तारीख पुसटत चालली होती आणि नांव मात्र कायम होतें. त्या नांवाची आम्हांला कांहींच माहिती नव्हती.

माझ्या मनांत सहज विचार आला—‘ शेंकडों माणसें येथें येऊन जाणार त्यांतील बहुतेक हें वाचणार. त्यांतलीं याच्या ओळखीचीं किती थोडीं असणार—आणि हा आम्हांला येवढें सांगण्याचा अट्टाहास कां करतों आहे **“ आम्ही येथें येऊन गेलों ! ”** म्हणून ? ’

"अरे कोण तूं ? कां इथें आला होतास ? काय केलेंस इथें येऊन ? देऊळ आहे म्हणून नमस्कार केला असशील ! दशम्या-थालिपिठें बरोबर आणलीं असलींस तर इथें खाऊन गेला असशील ! पण तेवढ्याकरितां पुढें येणाऱ्यांना ही नोंद कशाला—**आम्ही इथें येऊन गेलों म्हणून** ?"

माझ्या मनांत विचार चालले होते.

—आणि मग मला वाटलें. माझ्या मनांत माजलेल्या भकासपणावर हें खासें उत्तर आहे ! लहानपणीं लहान असलेला माणूस जसजसा मोठा होत जातो, तसतसा आपल्या आवांक्याप्रमाणें पुढेंपुढें—वरवर—जात असतो—त्याची पुढें जाण्याची—वर जाण्याची—गति थांबली—शक्ति विसावली, कीं तो वरखाली पाहत घुटमळूं लागतो. त्याची प्रगति तिथें थांबलेली असते आणि मग तो जाणतेपणानें वा अजाणतेपणानें अशीच क्रिया करीत राहतो, कीं त्या क्रियेचा अर्थ असा निघावा, कीं याला फक्त ओरडून सांगायचें आहे कीं,

**आम्ही येथें येऊन गेलों म्हणून !**

पुन्हा इथें यायचें असतें किंवा नाहीं हा वाद जरी साशंक असला तरी इथून आपणाला जायचें आहे ही गोष्ट शंकातीत आहे. आणि जात्या ठिकाणीं आठवण ठेवून जाणें हा जिवाचा धर्म आहे ! आणि मग मला वाटतें सर्व जीवांची धडपड येवढ्याकरितांच चालली आहे—जिवंत जग मृत्यूकडे पाहत आपल्या वागणुकीनें किंचाळत आहे कीं,

**"आम्ही येथें येऊन गेलों !"**

आणि या वेळेला मनुष्य आपल्या आयुष्याच्या मध्यावर उंचावर आलेला असतो ! स्वतःच्या अस्तित्वाची धास्ती तरी त्याला वाटूं लागलेली असते किंवा आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धाला सुरुवात झालेली आहे ही तरी जाणीव त्याला टोचूं लागलेली असते आणि मग तो कावराबावरा होऊन आपल्या जीविताच्या खुणेचा दगड ठेवण्याच्या प्रयत्नांत असतो, कीं त्या दगडाकडे पाहून लोकांनीं म्हणावें

**"हा इथें येऊन गेला म्हणून !"**

---

# उद्यां मेलों तर ? : : १७

तो दिवस मी कधीं जन्मांत विसरणार नाहीं !

त्या दिवशीं आम्ही चारजण स्नेही चांदण्यांत बोलत बसलों होतों. आम्ही सर्व एकमेकांना नेहमीं भेटणारे असल्यामुळें बोलण्याला नवीन असा विषय आमच्याजवळ राहिला नव्हता ! कोणी चांदण्यांकडे पाहत होता, कोणी नुसताच तोंडानें शीळ घालीत होता, कोणी हातांतल्या काठीनें जमिनीवर वर्तुळें काढीत होता आणि एकजण जमिनीवरचा एक खडा घेऊन वर-खालीं फेकून झेलीत बसला होता; आणि मी फक्त हें सारें पाहत होतों. माझ्या मनांत त्या वेळेला कांहीं म्हटल्या कांहींच विचार नव्हते !

इतक्यांत जो खडा झेलीत बसला होता त्याचें अंग सहज हललें आणि त्यानें वर फेकलेला खडा त्याच्या हातांत न पडतां त्याच्या डोळ्यावर पडला.

तो खडा नव्हता. तें एक मातीचें ढेकूळ होतें. तें फुटलें आणि त्याच्या दोन्ही डोळ्यांत माती गेली. तो आपले डोळे चोळूं लागला.

तो जवळजवळ आंधळ्यासारखा झाला.

सर्वजण हसूं लागले !

" खरंच, काय रे— आंधळा झालास तर काय वाटेल तुला ? "

एकानें गंमत म्हणून त्याला विचारलें.

" आनंद वाटेल ! " तो म्हणाला.

" असं कां ? " सर्वजण उद्गारले.

" हं. म्हणजे तुमचीं तोंड पाहायचा प्रसंग येणार नाहीं पुन्हा!"
तो अद्याप आपले डोळे चोळीतच होता.

झालेलीं प्रश्नोत्तरें तो आतां विसरला आणि खरेंच मोकळेपणानें हसूं लागला. " खरंच आंधळा झालों तर काय रे होईल माझं ?"

" आपण दर एकादशीला पैसा देत जाऊं तुला ! "

...सर्वजण म्हणाले.

पण या प्रश्नानें मात्र सर्वजण एकदम गंभीर झाले.

आणि प्रत्येकजण तो प्रश्न स्वतःला विचारून पाहूं लागला.

" खरंच मी आंधळा झालो तर माझं काय होईल ? "

इतक्यांत आकाशांत चांदण्या पाहत बसलेले गृहस्थ एकदम मला म्हणाले, " बर झालं, आज बोलायला विषयच नव्हता कांहीं. आयता मिळाला. 'आपण आंधळे झालों तर ?' या प्रश्नाचें कौतुक करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. समज तूं उद्यां मरणार आहेस— असं तुला आज कळलं— तुझ्या मनाची चलबिचल कांहीं झाली नाहीं असं आपण गृहीत धरूं, तर मरायच्या अगोदरचे चोवीस तास तूं कसे काढशील ? "

" प्रश्न तुझा आहे तेव्हां तूंच उत्तर दे पाहूं ? "

" कुठं लेखी न गुंततां मला जेवढे पैसे हातउसने गोळा करतां येतील तेवढे गोळा करून पाठीमागच्या माणसांकरितां घरांत आणून ठेवीन आणि मरून जाईन मी ! "

तो चेष्टेनें म्हणाला.

" आपला आतां एकच दिवस राहिला आहे. तेव्हां परिस्थितीच्या दडपणामुळें मीं जेवढे अपमान सहन केले आहेत तेवढ्यांना त्यांच्या तोंडावर शिव्या देऊन मनाचें समाधान करून घेईन आणि मग मी शांतपणानं देह ठेवीन ! "

दुसऱ्यानेंहि न विचारतांच उत्तर दिलें—

" आपण तेवढा एक दिवस चैनींत काढून—"

" आणि तूं रे ? "

मला प्रश्न विचारला गेला.

माझा स्वभाव माहीत असलेला एकजण म्हणाला, "अरे, हा कांहीं करणार नाहीं. मी फक्त उद्यां जाणार असं सर्वांना सांगण्यांतच याचा दिवस जाईल!"

मी हसलों आणि खरेंच मनाशी विचार करूं लागलों—

'खरंच मला उद्यां मरायचं आहे असं नक्की कळलं, तर मी हातीं असलेला एक दिवस कसा काढीन?'

कोणतीहि गोष्ट सोडून जातांना— त्या गोष्टींत एक प्रकारचें अलौकिक सौंदर्य आपल्याला वाटूं लागतें! तें सौंदर्य टेहळण्यांतच माझा सर्व दिवस संपून जाईल असें मला वाटलें!

मी समोर बसलेल्या माझ्या मित्रांकडे पाहूं लागलों. तों उद्यां उजाडत आहे —आणि समोर बसलेले माझे स्नेही माझी मृत्युवेळ जवळ आल्यामुळें एक एक वितळून जात आहेत असें मला वाटलें!

मग मरणार आहेत कोण? मी का ते? मी मेलों तरी कुठें तरी असणारच! माझ्यापुरता विचार करायचा झाला तर माझे सर्व स्नेही, आप्तगोत—मला माहीत असलेलें सर्व जग मरणार आहे!

—आणि मी कोठल्या तरी अज्ञात प्रांतांत प्रवासाला निघणार आहे!

—आयत्या वेळेला काय होईल तें सांगतां येत नाहीं—पण नवीन देश पाहायला जातांना जी आतुर उत्कंठा प्रदीप्त होते तसेंच मला मरतांना वाटेल असें आतां वाटतें आहे! प्रश्न पडणार आहे फक्त सोबतीचा.—चार ओळखीचे किंवा आप्त बरोबर असले तर प्रवासांत खरी मौज असते; पण तें या प्रवासांत कसें शक्य आहे?

आपल्या एकट्यालाच जावें लागणार!

वाः! पण ते कोणी बरोबर येणार नसले तरी त्यांच्या त्यांच्या सहवासामुळें कित्येक सुखद प्रसंगांचें दहिंवर मी सांठवलें आहे तें कोण घेणार आहे माझ्यापासून हिसकावून? त्या दहिंवरावरहि मी प्रवासांतली सोबतीची उणीव भरून काढूं शकेन!—काय, त्या आठवणी माझ्याबरोबर येणार नाहींत? वाः! वाः! तर मग फारच आनंद! या सर्वांची मरत्या वेळीं किंवा नंतर आठवणच जर नाहींशी होणार असेल—तर मग कशाची हो हुरहूर?

बरें, सुखद आठवणींच्या दहिंवराबरोबर कांहीं दुःखद प्रसंग—

पण प्रवासाला निघतांना आपण शक्य तों कमी सामान बरोबर नेत नाहीं का ? दुःखद आठवणींचीं ओझीं कोण वागवणार अशा वेळीं बरोबर !

पण खरेंच, आपल्याला उद्यां मरायचें आहे या कल्पनेनें तरारलेला माणूस बेभानपणानें कोणाचीहि भीड-मुरवत न ठेवतां जर बोलूं लागेल– तर किती कडवट सत्यें बोलायला लागेल तो ? तीं ऐकवायचीं सुद्धां नाहींत एखाद्याला !

—तीं न ऐकण्याकरितांसुद्धां एखादा मनुष्य उद्यांच्याऐवजीं आजच मरायला तयार होईल !

इतक्यांत एकजण मला म्हणाला, " अरे, खरंच उद्या मरायचं आहे अशा गंभीरतेनं कसला विचार करतो आहेस ? झटकन सुचेल ती कल्पना सांग ! का तुझ्या मनांत कांहीं तरीच कल्पना आली आहे ? "

" कसली ? "

" आतांपर्यंत संभावितपणानं आयुष्य घालविलंस—त्याचा सूड उगवणार आहेस एका दिवसांत ? "

" नाहीं ! कुणाजवळ कांहीं एक न बोलतां— किंवा मी उद्यां जाणार आहे याचा कुणाला कानोसाहि लागूं न देतां मी वेळ भरतांच गुपचूप होईन ! "

" मला वाटलंच तूं असा कांहीं तरी विक्षिप्तासारखं बोलशील म्हणून ! अरे, आपलं मरण असं आपल्याला आधीं कळलं असून सुद्धां असलं म्हातारं मरण मरणं, आपल्याला नाहीं आवडणार ! अरे, जिथून आपल्याला निघून जायचं आहे आणि परत केव्हांहि यायचं नाहीं अशा ठिकाणीं जातांना अशी एखादी लाथ झाडून गेलं पाहिजे, कीं पाण्यांत दगड टाकला किंवा गणपति-विसर्जनाकरितां गणपति पाण्यांत सोडला, कीं जसं पाणी हेलावतं, भोवरे करतं, तसं कांहीं तरी झालं पाहिजे आपण निघून गेल्याबरोबर ! अरे, लहान मुलींना खेळतांना पाहिलं आहेस ना तूं ? भातुकलीचा एक खेळ संपवितांना— असेल-नसेल त्याचा चट्टामट्टा करून– खेळायचीं चूलबोळकीं किती घिसाड-घाईनं भरून ठेवतात त्या ! किंवा लाथेनंच एखाद्या कोपऱ्यांत गोळा करून ठेवतात—एखादं बोळकं फुटतं सुद्धां त्या धांदलींत आणि जातात भुर्रदिशीं निघून दुसऱ्या खेळांत रंगण्याकरतां ! तसं कांहीं तरी करायला पाहिजे."

मी मनांत विचार करूं लागलों. अशा धसमुसळया वृत्तीच्या खोडकर माणसांना भिऊनच परमेश्वरानें माणसाचें मरण त्याला कळूं न देण्याची हिकमत योजिली असेल का ?

—कारण अगोदर मरणाची नोटीस मिळाल्यास जितकीं चांगलीं कृत्यें माणसाच्या हातून घडणें शक्य आहे— त्यापेक्षां वाईट घडणेंहि जास्त शक्य आहे !

—शिक्षेला भिऊन— एखाद्यानें एखाद्याचा खून करण्याचें तहकूब ठेवलें असेल—अशांचे खून त्या दिवशीं घडतील !

—मनांत भरलेल्या, पण अप्राप्य ठरलेल्या प्रेयसींना तो दिवस कठीण जाईल !

—चोऱ्या, दरोडे यांचे धुमाकूळ होतील !

—काय सांगावें, परिस्थितीमुळें सत्य-अहिंसेनें मिरवणारे देशभक्त तेवढ्या वेळांत कित्येक राजकीय खूनसुद्धां पदरीं पाडून घेतील !

घरकोंबडया माणसानें आपल्या खोलींत घुमवलेले विचार जगाच्या माथीं मारणें मोठें कठीण आहे !

'कांहीं कल्पना' म्हणून त्यांचें कौतुक करतां येईल. वाङ्मयांत त्या कल्पना चांगल्या म्हणून ठरतील, पण खऱ्या जीवनांत—?

—मी कांहीं न बोलतांच तोंडानें शीळ घालूं लागलों.

—तसें सर्वजण उठले व म्हणाले,

"चला आपण जाऊं या आतां; हा बहुतेक लागला घुमायला !"

मीं त्यांच्या जाण्याला कांहींच अडथळा केला नाहीं.

तेहि मुकाट्यानें निघून गेले !

आम्ही आमच्या अंगणांतच बोलत बसलों होतों. आमच्या घराला अंगण खूप मोठें होतें !

रात्रीचा एक-दीड वाजून गेला होता.

मी घरांत जायच्या विचारांत होतों.

आणि— माझ्या काय अंगांत आल्यासारखें झालें कुणाला ठाऊक. एक-दोन मिनिटांनीं लहान पोरासारखा मी अंगणांत खूप धावलों, बागडलों, जमिनी-वरच लोळण घेतली !

'उद्यां मेलों तर ?' या कल्पनेनें मी खरोखरच खूप झिंगलों होतों !

थोडयाच वेळांत माझा तो उन्माद थोडासा कमी झाला.

मी एखाद्या पुढाऱ्यासारखा धीमेपणानें घरांत जाऊं लागलों !

जाता माणूस नेहमींच मोठा असतो !

मी आपल्या खोलींत आलों.

आजच मी उदबत्त्यांचा नवीन पुडा विकत आणलेला होता.

तो मीं सोडला. आणि खरें सांगूं— एक-दोन उदबत्त्या न पेटवितां मीं सबंध पुडाच एकदम पेटवला !

दिवस उन्हाळ्याचे होते.

मी तसा फारसा रसिक मनुष्य नव्हे ! मला फुलेंसुद्धां फारशीं कोणतींच आवडत नाहींत. मला फक्त एक-दोनच शौक आहेत !

बसल्या जागीं नेहमीं एखादी उदबत्ती तेवत ठेवणें.

—आणि उन्हाळ्याच्या रात्रीं—

" गजरा मोतियाचा ! "

—आजहि मोतियाचा गजरा माझ्या टेबलावर होताच ! मीं त्याचा दोरा सोडला. फुलें मोकळीं केलीं. हातांत घेतलीं.

एखाद्या पुस्तकांत मन रमतें का पाहावें म्हणून एक पुस्तक काढलें, दुसरें काढलें–तिसरें काढलें–पुस्तकें तशींच टाकलीं–आणि अंथरुणावर पडलों.

—हातांतील फुलें मी आपल्या अंगावरच उधळलीं !

माझ्या मनावर कसली तरी गोड गुंगीच मोहिनी घालून बसली होती !

माझ्या मनांत पण एकदम झटकन् विचार आला कीं, 'उद्यां मेलों तर ?' या कल्पनेनें एवढें का मला मोहिलें आहे.

" उद्यां मेलों तर ? " या कल्पनेंतली उद्यां जर पुसली–तर हा प्रश्न नेहमींचाच नाहीं का ? प्रत्येकजण आपलें मरण फार तर लांब गृहीत धरीत असेल–पण आपणाला मरणच नाहीं असें तर कोणी गृहीत धरीत नसेल ?

" मग उद्यां मेलों तर ? " या कल्पनेनें मला येवढें तरारल्यासारखें कां व्हावें ?—काय मी आपलें मरण केव्हांच गृहीत धरलें नव्हतें ?

—कसें शक्य आहे ?

—पण तो विचार कधीं माझ्या मनांत आतांपर्यंत आलाच नव्हता !

—आज तो विचार सहज माझ्या मनांत आला—भांबावून गेलों मी त्या कल्पनेनें !

पण हा कैफ उद्यां उतरेल—या कैफाच्या आठवणीनें एखाद्या वेळीं चार कागद काळे करीन. त्या वेळींहि कदाचित् बरें वाटेल !

—पण जीवनावर काय परिणाम होणार त्यांचा ?

—जीवन !

—मृत्यु ! !

—सूर्योदय !

—सूर्यास्त ! !

—परमेश्वरानें हें जगच मुळीं कसल्या तरी कैफांत निर्माण केलें आहे !

* * *

—रात्रीचे अडीच-तीन वाजून गेले होते. लवकरच उजाडणाऱ्या पहाटेचा गारवा हवेंत संचरूं लागला होता !

—माझे डोळे मिटत चालले होते !

—" उद्यां मेलों तर ? " मी मनांत पुटपुटलों—

आणि रोजचें मरण जी झोप तें येण्याकरितां मी अंगावर पांघरूण घेऊन डोळे मिटले.

—आणि सर्व कल्पना तिथेंच थांबल्या.

—कल्पनेची गुंगी झोपेंत विलीन पावली !

---

# माझें आजपर्यंतचें प्रकाशन

| | किंमत |
|---|---|
| १ पुनर्भेट भाग २ रा | १–०–० |
| २ वळवांचे पाऊस | १–४–० |
| ३ दुर्दैवी मोहरे | १–०–० |
| ४ पैसाच पैसा | १–०–० |
| ५ फुलबाग | १–०–० |
| ६ जीवनपथ | १–०–० |
| ७ आवडत्या गोष्टी | ३–०–० |
| ८ चित्तरंजन | १–४–० |
| ९ वायफळांचा मळा | २–८–० |
| १० सोनेरी नागीण | १–०–० |
| ११ वाहते वारे | ०-१२-० |
| १२ रशियांतील राज्यक्रांति | २–८–० |
| १३ बाबू कुँवरसिंह | ०-१२-० |
| १४ प्रो. शहाणे | ०-१२-० |
| १५ गुलाबाच्या पाकळ्या | १–४–० |
| १६ पुनर्भेट भाग ३ रा | १–४–० |
| १७ गारांचा वर्षाव | १–४–० |
| १८ रेशमी चिमटे | १–४–० |
| १९ उपहासिनी | १–८–० |
| २० शि. म. परांजपे चरित्र व आठवणी | १–०–० |
| २१ आपट्याचीं पानें | ०-१२-० |
| २२ व्यक्ति आणि वाङ्मय | १–४–० |
| २३ साहित्य-संग्रह | ३–०–० |
| २४ ललिता | १–८–० |
| २५ तंट्या भिल्ल | ०-१२-० |
| २६ परशुराम चरित्र | १–४–० |
| २७ हिंदुस्थानची नवी राज्यघटना | १–०–० |
| २८ हायस्कूल विद्यार्थी | ०–८–० |
| २९ उत्तरध्रुव | ०–४–० |
| ३० सोशॅलिझम | १–०–० |
| ३१ चुटके चमत्कार | ०-१२-० |
| ३२ अलका | २–४–० |
| ३३ सांवल्या | १–८–० |
| ३४ तिचें अखेरचें पत्र | १–०–० |
| ३५ चांदणें | १–०–० |
| ३६ बलिदान | २–०–० |
| ३७ होमकुंड | २–०–० |
| ३८ बोलका सिनेमा | ०–८–० |
| ३९ खेड्यांतील स्वभावचित्रें | १–४–० |
| ४० उर्मिला | २–०–० |
| ४१ मलबारहिल | २–८–० |
| ४२ आईची कृपा | १–०–० |

प्रकाशकः—यशवंत गोपाळ जोशी, ६२३।१५ सदाशिव, पुणें.